# सुभाषित-पुष्प-मकरंद



विषया विविधा यस्य प्रायो बोधप्रदं नृणाम् ।
हृद्यं पद्यं पद्यखण्डं गद्यं वा स्यात्सुभाषितम् ॥ १ ॥

---



भाषांतरकार

**मुकुंद गणेश मिरजकर.**

---

१९२४

---

किंमत पांच आणे.

# प्रस्तावना

संस्कृत भाषेंत सुभाषितांचा भरणा अतिशय मोठा. सामान्यतः कोणताही विषय घेतला तरी त्यावर सर्वांगसुंदर सुभाषित नाहीं असें बहुधा घडणार नाहीं. संस्कृताचा विशेष अभ्यास न करितांही शेंकडों सुभाषितें सहजावारीं पाठ करून बहुश्रुत बनलेले अनेक गृहस्थ जुन्या पिढींत दिसून येत. व्याकरण, न्याय, वेदान्त इत्यादि शास्त्रीय विषयांवरील मार्मिक व विनोदी वचनें, व्यवहारोपयोगी हजारों दृष्टान्त, अन्योक्ति, स्वभावोक्ति, वक्रोक्ति इत्यादिकांनीं मिळणारें मनोरंजन व ज्ञान, अनेकविध कोट्या, नवरसांचे प्रवाह, घरगुती दाखले, जुने संस्कार, जुन्या कथा, नीति, उपदेश, सदाचार इत्यादि कितीतरी आल्हादप्रद ज्ञानभांडार त्यांत भरलेलें आहे.

जुने हरिदास, पुराणिक, धर्मोपदेशक यांच्या संग्रहीं सुभाषितांचा मुबलक सांठा असल्यानें ते तत्कालीन श्रोतृमंडळावर कशी छाप बसवीत व हंसत खेळतच आबालवृद्धांस धर्माचीं तत्त्वें कशीं समजावून देत हें सर्वश्रुत आहेच.

अलीकडील पिढीस थोडाफार काव्यनाटकादिकांचा परिचय झालेला असतो पण सुभाषितांचें अंग अजीबात गळल्यानें त्यांस खरें मनोरंजन मिळण्याची एक बाजू लंगडी पडते. हा दुष्परिणाम घडूं नये म्हणून रसिकवर्य कै० विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं निबंधमालेंतून अर्थासह सुभाषितें देण्याचा उपक्रम केला होता. हल्लींच्या कॉलेजांतील विद्यार्थ्यांसही १०।५ सुभाषितें पाठ म्हणणें अवघड जातें. बोलण्याचालण्याच्या नेहमींच्या प्रसंगांतही 'अमक्या कवीचें या विषयावर एक वचन असावेंसें वाटतें' असेंच जो तो म्हणतो; पण तें वचन अगर सुभाषित आठवेल तर शपथ!

आमच्या मतें पाठांतराचा अभाव हेंच याचें मुख्य कारण होय. लहानपणीं भूपाळ्या, प्रातःस्मरण, देवपूजेचे मंत्र, रामरक्षादि स्तोत्रें, मजेदार सुभाषितें, आरत्या, रामदासी श्लोक व वडील माणसांच्या आवडीप्रमाणें आणखी कित्येक प्रसंगांवरील कविता पूर्वी अनायासें पाठ होऊन जात

असे. व एकदां अशी सवय लागल्यानें विद्यार्थी हौसेनें हा पूर्वदत्त ठेवा वाढवीत असे. रामायणमहाभारतांतील श्लोकांचा व्याकरणशः अर्थ न कळला तरी वृद्ध माणसें त्यांतील तात्पर्य अचूक ग्रहण करीत असत. आज हा सर्व प्रकार पुष्कळ अंशीं बुडाला आहे. प्रौढ विद्यार्थ्यांसही साधारण संस्कृत-प्राकृत श्लोक वाचतां येईनातसें झालें आहे. मग पुढची बात दूरच ! तात्पर्य, या अनिष्ट प्रकारास आळा घालणें जरूर आहे. पालकांनीं व शिक्षकांनीं वेळींच इकडे लक्ष न दिल्यास मुलें पूर्वसंस्कृतीला आंचवतील यांत संशय नाहीं. असो.

सध्यांच्या मराठी कवितेचें बाह्य स्वरूपही थोडें निराळें झालें आहे. कित्येकांस यमकें आवडत नाहींत. कोणांस कठिण शब्द नको आहेत. कांहींजणांस जुनीं वृत्तें नापसंत आहेत. कोणी संस्कृतांतील श्लेष, कवि-संकेत, कोट्या वगैरेचा तिरस्कार करितात. कित्येकांस कसलेंही शब्द कोठेंही घुसडले तरी चालतात. तेव्हां या सर्वांच्या अभिरुचीला योग्य असें काव्य कोण निर्माण करणार !

आमच्या मतें जुन्या वाङ्मयाचा अभ्यास कमी झाला हेंच याचें कारण होय. वामन, मुक्तेश्वर, मोरोपंत इत्यादि कवींच्या ग्रंथांचें आस्थापूर्वक अध्ययन करणारे लोक दिवसेंदिवस कमी होत आहेत. गद्यभाषेच्या पली-कडील थोडेसे अवघड शब्द दिसून येतांच वाचक कंटाळतात. अक्षरगण, मात्रागण, समवृत्तें, विषमवृत्तें इत्यादिकांचा परिचय नसल्यानें श्लोकांच्या चाली कळेनातशा झाल्या आहेत. शब्दांचा भरणा कमी पडल्यानें यमकां-चा कंटाळा येऊं लागला. दहावीस ओळींच्या तोकडया कविता वाच-ण्याची संवय झाल्यानें जुनीं काव्यें पाल्हाळिक, दुर्बोध व ठरीव साच्यांचीं वाटूं लागलीं. कवितेची पूर्वपरंपरा माहीत नसल्यानें वाटेल तो शब्द वाटेल त्या ठिकाणीं घातला तरी कानाला गोड लागूं लागला व असेंच करणें योग्य आहे असेंही समर्थन कित्येकांकडून होऊं लागलें. व्याकरणाचीही हीच दशा ! "आम्हांला बंधन काय करावयाचें आहे ? आम्ही सैरावैरा भांवणार ! निरंकुशाः कवयः !!" बिचाऱ्याला व्याकरण कळेनासें झालें हें लपविण्याकरितां केवढा तरी हा दिमाख ! कित्येकांची मजल तर याच्याही पुढें गेली आहे. ते म्हणतात "शुद्धलेखन कशास हवें ?"

एकूण या आपत्तींतून पार कसें पडावें हा मोठाच प्रश्न आहे. दिवसें-दिवस कवितेला एकांगी स्वरूप प्राप्त होत आहे. प्राचीन कवितेचा आस्था-पूर्वक अभ्यास करणें हा एकच यास उपाय आहे.

आतां यावरून क्लिष्ट काव्य करावें, यमकांकरितां अर्थाची ओढाताण झाली तरी चालेल, अलंकार खेंचून भरलेच पाहिजेत, नवीन वृत्त बिलकूल कामा नये, असें आमचें मत आहे असें कोणींही समजूं नये. पूर्वपरंपरा बुडूं न देतां नवीन सुधारणा करण्यास कोणीही अडथळा घेणार नाहीं.

एकादें चांगलें सुभाषित वाचलें अगर ऐकिलें म्हणजे तें वारंवार तोंडांत खेळून केव्हां केव्हां याचें मराठी भाषांतर करावें असें आम्हांस वाटे व अनायास तसें घडूनही येई. अशी वेळोवेळीं केलेली कविताच आज या पुस्तकरूपानें छापविली आहे. मराठी भाषेंत स्वतंत्र सुभाषितें फार थोडीं आहेत. ज्ञानेश्वर, रामदास, तुकाराम, मोरोपंत इत्यादिकांच्या कवितेंतून अशीं सुभाषितें निवडून तीं छापविण्याचा प्रयत्न कोणीं केल्यास आवश्यक आहे. या बाबतींत लहान लहान पुस्तकें कांहीं निघालीं आहेत पण सुभाषितरत्नभांडाराप्रमाणें सर्व कवींचा विस्तारानें त्यांत समावेश झालेला नाहीं. शिवाय मोठें भांडार तयार झालें तरी त्यांत संस्कृताप्रमाणें विविधता व मनोरंजकता येईल कीं नाहीं याची वानवाच आहे. अशा प्रकारची अडचण असल्यानें मराठी भाषेचें हें एक अंग निदान संस्कृताच्या मदतीनें तरी आधुनिक कवींनीं भरून काढिल्यास चांगलें होईल. हजारों सुभाषितांचें भाषांतर एकट्या व्यक्तीच्या हातून होणें अशक्य असल्यानें या कामीं पुष्कळांनीं लक्ष्य घातलें पाहिजे. निदान आपल्या कवितामालिकेंत प्रत्येकानें एकादा तरी सुभाषितगुच्छ गुंफिल्यास पुष्कळ कार्य होण्यासारखें आहे. आमचा उपक्रमही अशाच पैकीं आहे. तो सर्वांस पसंत पडल्यास या पुस्तकाचा आणखी एकादा भाग काढणें शक्य आहे.

"सुभाषित" शब्द अत्यंत परिचित आहे. तथापि त्याची सर्वार्थ-संग्राहक समर्पक व्याख्या कोणीं केलेली आमच्या पाहण्यांत नाहीं. व्यवहार चालत आहे; पण 'सुभाषित म्हणजे काय'? असें विचारिलें असतां तावडतोब थोडक्यांत त्याचें उत्तर देणें फार कठीण जातें. मोरोपंती काव्यग्रंथप्रकाशक

रा० पराडकर यांनीं एकदा अशा प्रकारची सर्वमान्य व्याख्या ठरविण्या-बद्दल विद्वान् लोकांस जाहीर विनंति केली होती; पण त्यांस फारसें यश आलें नाहीं. आम्ही खालील श्लोकांत असा थोडासा प्रयत्न करीत आहों.

विषया विविधा यस्य प्रायो बोधप्रदं नृणाम्।
हृद्यं पद्यं पद्यखंडं गद्यं वा स्यात्सुभाषितम्॥ १॥

यांत कोणास कांहीं कमीजास्त करावेंसें वाटत असल्यास कृपा करून त्यांनीं आम्हांस कळवावें. यापेक्षां अधिक उपयुक्त लक्षण कोणीं बन-विल्यास तेंही हवेंच आहे.

संस्कृत कवितेचें मराठींत रूपांतर करण्याची पद्धति फार जुनी आहे. ज्ञानेश्वरांनीं प्रथम मराठींत गीताश्लोकांचा थोडक्यांत अर्थ देऊन पुढें अधिक विवरण केल्याचें प्रसिद्धच आहे. सुभाषितांचे भाषांतर सामान्यतः वामनपंडितांपासून अधिक रूढ झालें असें मानण्यास हरकत नाहीं. त्यांचे नीतिपर श्लोक वाचीत असतां हे मूळ संस्कृतांतील आहेत असें भानही वाचणारांस रहात नाहीं इतके ते सफाईदार आहेत. पंडितांनंतर अली-कडील काळांतही रसिकशिरोमणि परशुरामपंततात्या गोडबोले, कृष्ण-शास्त्री राजवाडे, गणेशशास्त्री लेले, कृष्णशास्त्री चिपळूणकर, पारखीशास्त्री व विद्यमान लक्ष्मणशास्त्री लेले इत्यादिकांनीं सुंदर काव्यांचें भाषांतर कर-ण्याची परंपरा अद्यापि चालविली आहे. नवीन पिढींत मात्र हा प्रकार आढळत नाहीं ही खेदाची गोष्ट होय.

प्रस्तुत सुभाषितें रचितांना तीं समवृत्तांतच झालीं पाहिजेत अशी आमची दृष्टि नव्हती. बहुतेक ठिकाणीं स्वाभाविक सुचलेलें वृत्त घेतलें आहे. तथापि निम्मे अधिक श्लोक त्याच वृत्तांत येऊन गेले आहेत. सर्वच कविता समवृत्तांत रचावयाची असें ठरविलें असतें तरी तें काम फारसें कठीण झालें असतें असें नाहीं. साधारणपणें मोरोपंतादिकांच्या कवितेशीं ज्यांचा थोडा फार परिचय आहे त्यांस या कविता बिलकूल अवघड वाटणार नाहींत. प्रसादहानि न होऊं देतां संस्कृत शब्दांचा उपयोग केला आहे. परक्या भाषेंतील शब्द व स्वभाषेंतीलही गद्यमात्रो-पयोगी अतिपरिचित शब्द शिष्टसंप्रदायानुरूप टाळले आहेत. मूळांतील अर्थ कोठेंही सोडलेला नाहीं. एकंदरींत—

नामूलं लिख्यते किंचित् नानपेक्षितमुच्यते ।

हें व्रत सांभाळण्याचा प्रयत्न सर्वत्र केला आहे. सुभाषितांची निवड करितांना होतां होईल तों विविधता व बोधप्रदता यावी हें धोरण स्वीकारलें आहे. मूळ श्लोक व भाषांतर जवळच असल्यानें तज्ज्ञ जनांस गुणदोषविवेचन सुलभ जाईल. विद्यार्थ्यांस या पद्धतीचा अधिक उपयोग आहे. संस्कृताबरोबर मराठी शब्दसंग्रहही त्यांस आपोआप वाढवितां येईल. मूळ श्लोक पाठ करितां येतील आणि भाषांतराची पद्धतिही सहजगत्या समजेल.

नूतन मराठी विद्यालयाचे सुपरिंटेंडंट प्रो० रा. प. सबनीस यांच्या नजरेखालून या पुस्तकाची हस्तलिखित प्रत गेली असल्यानें विद्यार्थ्यांनीं निःशंक वाचण्यासारखीं हीं सर्व सुभाषितें आहेत हें निराळें सांगावयास नको. शेवटच्या टीपांत वृत्तांचीं लक्षणें मुद्दाम दिलीं आहेत. तीं सर्व विद्यार्थ्यांनीं अवश्य पाठ करावीं. अमुकच इयत्तेतील विद्यार्थ्यांकरितां हा प्रयत्न आहे असें नाहीं. तथापि हायस्कूलांतील व ट्रेनिंग कॉलेजांतील विद्यार्थ्यांस याचा चांगला उपयोग होईल अशी आशा आहे.

विजयादशमी<br>शके १८४६

मु. ग. मिरजकर.





# श्रीलघुगीता.

या पुस्तकांत श्रीभगवद्गीतेंतील निवडक २०० श्लोक अर्थाची विसंगती न होऊं देतां संगृहीत केले आहेत. हे विद्यार्थ्यांनीं नित्यपाठांत आणिल्यास त्यांस सर्वमान्य गीताग्रंथांतील प्रधान तत्त्वें लवकर आकलन होतात, वाणी शुद्ध होते व अंतःकरणास प्रसन्नता लाभते. पुष्कळ हायस्कुलांतून प्रार्थना व सार्थ पाठांतर याकरितां या पुस्तकाचा उपयोग केला जातो. हें विद्याखात्यानें बक्षिसासाठीं व ग्रंथालयासाठीं मंजूर केलें आहे. दोन महिन्यांतच एक आवृत्ति संपत आली. किंमत अवघी दीड आणा.

मु. ग. मिरजकर,
६२५ शनिवार, पुणें शहर.

# सुभाषितमकरंद

## मंगलाचरण

जान्हवी मूर्ध्नि पादे वा कालः कंठे वपुष्यथ ।
कामारिं कामतातं वा कंचिद्देवं भजाम्यहम् ॥ १ ॥

गंगा शिरीं पदीं वा, कृष्ण गळा वा यदीय तनु फार ।
कामारीला वा त्या कामापित्याला असो नमस्कार ॥ १ ॥

वपुःप्रादुर्भावादनुमितमिदं जन्मनि पुरा
पुरारे न क्वापि क्वचिदपि भवन्तं प्रणतवान् ।
नमन् मुक्तः संप्रत्यहमतनुरग्रेऽप्यनतिमा-
नितीश क्षन्तव्यं तदिदमपराधद्वयमपि ॥ २ ॥

वपुःप्रादुर्भावें मजसि कळलें पूर्वजननीं ।
पुरारे मातें त्वत्स्मरण नच झालें निजमनीं ॥
नमस्कारें आतां अतनु, मग कोठील नमन ।
करीं देवा ! तें तूं उभयअपराधप्रशमन ॥ २ ॥

रामो नाम बभूव हुं तदबला सीतेति हुं तां पितु-
र्वाचा पंचवटीवने निवसतस्तस्याहरद्रावणः ।

कृष्णेनेति पुरातनीं निजकथामाकर्ण्य मात्रेरितां ।
सौमित्रे क्व धनुर्धनुर्धनुरिति प्रोक्ता गिरः पान्तु वः ॥ ३॥

झाला राम म्हणोनि, हूं, तदबला सीता सती, हूं तिला ।
ताताज्ञें वसतां वनीं दशमुखें नेलें बळें स्वस्थला ॥
पूर्वीची स्वकथा अशी जननिनें उच्चारितां–लक्ष्मणा ! ।
आहे कोठ धनू धनू धनु म्हणे तो कृष्ण रक्षो जना ॥ ३॥

करारविन्देन मुखारविन्दे
पदारविन्दं विनिवेशयन्तम् ।
वटस्य पत्रस्य पुटे शयानं
बालं मुकुंदं मनसा स्मरामि ॥ ४ ॥

करारविंदें वदनारविन्दा—।
मधें धरी जो चरणारविन्दा ॥
शिशू युगान्तीं वटपत्रशायी ।
मुकुंद रक्षो मज तो अपायीं ॥ ४ ॥

शारदा वरदा कुर्याच्छालां छात्रसमाकुलाम्
बटून् विद्यापटूंश्चैव सदोत्साहगुरून् गुरून् ॥ ५ ॥

शाला छात्रसमाकुल वरदा श्रीशारदा करो देवी ।
विद्यापटू बटूतें उत्साहगुरू गुरुप्रती तेवीं ॥ ५ ॥

तद्दिव्यमव्ययं धाम सारस्वतमुपास्महे ।
यत्प्रसादात्प्रलीयन्ते मोहान्धतमसश्छटाः ॥ ६ ॥

अव्यय दिव्य मनोहर भजतों सारस्वताख्य मी धाम ।
ज्याचा प्रसाद होतां मोहतमाचें न राहतें नाम ॥ ६ ॥

कूजन्तं रामरामेति मधुरं मधुराक्षरम् ।
आरुह्य कविताशाखां, वन्दे वाल्मीकिकोकिलम् ॥७

श्रीराम राम ऐसा कविताशाखेवरूनि आलाप ।
करि मंजुल, नुरतें त्या नमितां वाल्मीकिकोकिला पाप ॥ ७ ॥

---

## कवि आणि कविता

काव्यशास्त्रविनोदेन कालो गच्छति धीमताम् ।
व्यसनेन तु मूर्खाणां निद्रया कलहेन वा ॥ ८ ॥

जातो काळ बुधांचा शास्त्रानें सुकविताविनोदानें ।
व्यसनानें मूर्खांचा निद्रेनें वा तथैव कलहानें ॥ ८ ॥

पृथिव्यां त्रीणि रत्नानि जलमन्नं सुभाषितम् ।
मूढैः पाषाणखंडेषु रत्नसंज्ञा विधीयते ॥ ९ ॥

पृथिवीमाजी रत्नें जल अन्न सुभाषितें अशीं तीन ।
प्रस्तरशकला देती मणिसंज्ञा सर्वथैव मतिहीन ॥ ९ ॥

बोद्धारो मत्सरग्रस्ताः प्रभवः स्मयदूषिताः ।
अज्ञानोपहताश्चान्ये जीर्णमंगे सुभाषितम् ॥ १० ॥

ज्ञाते मत्सर करिती गर्वानें धनिक जाहले मस्त ।
तदितर अज्ञ मनुष्यें यास्तव सत्काव्य पावलें अस्त ॥१०॥

लंकापतेः संकुचितं यशो यद्
यत्कीर्तिपात्रं रघुराजपुत्रः ।
स सर्व एवाद्यकवेः प्रभावो
न कोपनीयाः कवयः क्षितीन्द्रैः ॥ ११ ॥

लंकापतीस यश अल्प न ही मिळालें ।
कां कीर्तिपात्र रघुराजचरित्र झालें ॥
हा होय आद्यकविचा अवघा प्रताप ।
आणों नये नृपतिनें कविलागि कोप ॥ ११ ॥

श्लोकयुग्म

साहित्यपाथोनिधिमन्थनोत्थं
कर्णामृतं रक्षत हे कवीन्द्राः ।
यत्तस्य दैत्या इव लुंठनाय
काव्यार्थचोराः प्रगुणीभवन्ति ॥ १२ ॥
गृण्हन्तु सर्वे यदि वा यथेच्छं
नास्ति क्षतिः कापि कवीश्वराणाम् ।
रत्नेषु लुप्तेषु बहुष्वमर्त्यै-
रद्यापि रत्नाकर एव सिन्धुः ॥ १३ ॥

अव्यग्रता बहु कवीश्वरहो ! असावी ।
हे वाङ्मयाब्धिमथनोत्थ सुधा जपावी ॥
दैत्यापरी अहह ! तोप्रति चोरण्याला ।
काव्यार्थचोरगण सिद्ध असे जहाला ॥ १२ ॥

किंवा–समग्रहि लुटोत यथावकाश ।
यानें कवीश्वर न मानिति अर्थनाश ॥
देवीं यथेच्छ जरि रत्नसमूह नेले ।
रत्नाकरत्व परि तोयधिचें न गेलें ॥ १३ ॥

सन्ति श्वान इवासंख्या जातिभाजो गृहे गृहे ॥
उत्पादकास्तु विरलाः कवयः शरभा इव ॥ १४ ॥

श्वानापरि पुष्कळसे असति घरोघर कवीन्द्र नांवाचे ।
विरल प्रतिभाशाली शरभापरि भूतलामधें साचे ॥ १४ ॥

विद्वत्कवयः कवयः केवलकवयस्तु केवलं कपयः ।
कुलजा या सा जाया केवलजाया तु केवला माया॥

विद्वत्कवि तेचि कवी केवल कवि कपिच तत्कृती वाया ।
कुलजा जाया जाया केवलजायेसि बोलती माया ॥ १५ ॥

विद्वानेव विजानाति विद्वज्जनपरिश्रमम् ।
न हि वंध्या विजानाति गुर्वीं प्रसववेदनाम् ॥१६ ॥

विद्वत्परिश्रमातें विद्वानांनींच मात्र जाणावें ।
पावे प्रसूतिका ते वन्ध्या न प्रसव-वेदना पावे ॥ १६ ॥

सौवर्णानि सरोजानि निर्मातुं सन्ति शिल्पिनः
तत्र सौरभनिर्माणे चतुरश्चतुराननः ॥ १७ ॥

कांचनकमल कराया कारागिर काय थोडके असती ।
निर्माया तेथ परी सुगन्ध चतुराननाविणें न कृती ॥ १७ ॥

मन्दं निक्षिपते पदानि परितः शब्दं समुद्वीक्षते ।
नानार्थाहरणं च कांक्षति मुदाऽलंकारमाकर्षति ॥
आदत्ते निखिलं सुवर्णनिचयं धत्ते रसान्तर्गतम् ।
दोषान्वेषणतत्परो विजयते चोरोपमः सत्कविः॥ १८॥

टाकी मन्द पदें बघे चहुंकडे शब्दा जपे त्यांतुनी ।
नानार्थाहरणीं पटू बहुविधालंकार घे शोधुनी ॥
साराही लुटुनी सुवर्णनिधि जो पाही रसान्तर्गत ।
दोषान्वेषक तस्करोपम कवी लाभो जगा शाश्वत ॥ १८ ॥

हठादाकृष्टानां कतिपयपदानां रचयिता
जनः स्पर्धालुश्चेदहह ! कविना वश्यवचसा ।
भवेदद्य श्वो वा किमिह बहुना पापिनि कलौ
घटानां निर्मातुस्त्रिभुवनविधातुश्च कलहः ॥ १९ ॥

अहो ! मोठ्या कष्टें जुळवुनि पदें चार जडधी ।
कवीशाशीं स्पर्धा करित, वश ज्या वाङ्मयनिधि ॥
कलीच्या साम्राज्यीं तरि घटविधाताहि अहह !
त्रिलोकीधात्याशीं करिल न कसा दीर्घ कलह ॥ १९ ॥

श्लोकः श्लोकत्वमायाति यत्र तिष्ठन्ति साधवः ।
लकारो लुप्यते तत्र यत्र तिष्ठन्त्यसाधवः ॥ २० ॥

जेथें रसज्ञ तेथें श्लोकातें श्लोकता मिळे बरवी ।
अरसिकसभेमधें तो स्वगतलकारासि मात्र हा ! हरवी ॥२०

काव्यं यशसेऽर्थकृते व्यवहारविदे शिवेतरक्षतये ।
सद्यः परनिवृतये कांतासंमिततयोपदेशयुजे ॥२१ ॥

कीर्ती मिळो धन मिळो व्यवहार यावा ।
व्हावें अविघ्न रसिकाप्रति तोष द्यावा ॥
कांतेसमान मृदुबोध जना करावा ।
हेतू असा स्वकवनीं कविचा असावा ॥ २१ ॥

इतरकर्मफलानि यथेप्सितं
वितर तानि सहे चतुरानन ।
अरसिकेषु कवित्वनिवेदनं
शिरसि मा लिख मा लिख मा लिख ॥ २२ ॥

इतरकर्मफलासि यथेच्छ दे ।
मज विधे, नच अक्षरही वदें ॥
अरसिकासि कवित्वनिवेदन ।
परि शिरीं न लिहीं न लिहींच न ॥ २२ ॥

पुरा कवीनां गणनाप्रसंगे
कनिष्ठिकाधिष्ठितकालिदासः ।
अद्यापि तत्तुल्यकवेरभावा-
दनामिका सार्थवती बभूव ॥ २३ ॥

पूर्वी कवीन्द्रगणनासमयीं मिळाला ।
श्रीकालिदासकविहीर कनिष्ठिकेला ॥
अद्यापि तत्समकवी जगतीं न झाला ।
अन्वर्थता म्हणुनि येत अनामिकेला ॥ २३ ॥

कालिदासकवेः काव्यं कालिदासः सरस्वती
चतुर्मुखोऽथवा साक्षात् विदुर्नान्ये तु मादृशः ॥ २४ ॥

कविता कालिदासाची कालिदास सरस्वती ।
ब्रह्मा वा जाणतो साक्षात् न चले आमुची मति ॥ २४ ॥

कृत्स्नप्रबोधकृद्वाणी भा रवेरिव भारवेः ।
माघेनेव च माघेन कंपः कस्य न जायते ॥ २५ ॥

भा रविची तेविं असे भारविची या प्रबोधकर वाचा ।
माघापरि माघानें कंपा पावे कसा न जन साचा ॥ २५ ॥

खिन्नं चापि सुभाषितेन रमते स्वीयं मनः सर्वदा
श्रुत्वाऽन्यस्य सुभाषितं खलु मनः श्रोतुं पुनर्वांछति

अज्ञान् ज्ञानवतोऽप्यनेन हि वशीकर्तुं समर्थो भवेत् ।
कर्तव्यो हि सुभाषितस्य मनुजैरावश्यकः संग्रहः ॥ २६

पावे स्वीय सुभाषितें निरवधी आनंद खिन्नांतर ।
चित्ता अन्यसुभाषितें परिसण्या वाटे बहू आदर ॥
यानें अज्ञहि सुज्ञही जन झणीं होती स्वकार्योत्सुक ।
व्हावा कां न बुधां सुभाषितनिधी संग्राह्य आवश्यक ॥ २६ ॥

कस्त्वं भोः कविरस्मि काप्यभिनवा सूक्तिः सखे पठ्यताम्
त्यक्ता काव्यकथैव संप्रति मया कस्मादिदं श्रूयताम् ।
यः सम्यग् विविनक्ति दोषगुणयोः सारं स्वयं सत्कविः
सोऽस्मिन् भावक एव नास्त्यथ भवेद्दैवान्न निर्मत्सरः ॥ २७ ॥

बा तूं कोण कवी असें सुकविता कांहीं वदावी नवी ।
गेलें काव्य लया मम स्मृति तरी त्याची कशाला हवी ॥
काव्याचें गुणदोषसार कविला कैसें स्वयें बोलवे ।
नाहीं मार्मिक, लाभल्या विधिवशें द्वेषाग्नि त्यातें शिवे ॥ २७

वस्तुस्वभावोऽत्र कवेरतन्त्रो
गुणागुणावुक्तिवशेन काव्ये ।
स्तुवन्निवध्नात्यमृतांशुमिंदुं
निन्दंस्तु दोषाकरमाह धूर्तः ॥ २८ ॥

स्वभाव आहे कविचा विचित्र ।
स्तवी कधीं दे कधिं दोष मात्र ॥
ज्यातें सुधांशू म्हणवोनि वानी ।
क्षणांत दोषाकर त्यास मानी ॥ २८ ॥

जयन्ति ते सुकृतिनो रससिद्धाः कवीश्वराः।
नास्ति येषां यशःकाये जरामरणजं भयम्॥ २९॥
रससिद्ध ते कवीश्वर पुण्यात्मे पावती सदा विजय।
ज्यांच्या यशःशरीरा तिळाहि जरामृत्युचें उरे न भय॥२९॥

---

## सज्जन-प्रशंसा

धवलयति समग्रं चंद्रमा जीवलोकं
किमिति निजकलंकं नात्मसंस्थं प्रमार्ष्टि।
भवति विदितमेतत्प्रायशः सज्जनानां
परहितनिरतानामादरो नात्मकार्ये॥ ३०॥
धवल करित सर्वा चंद्रमा जीवलोका।
मग नच पुशितो कां आपुल्या दुष्कलंका॥
सुविदित बहुधा हे सज्जनालागि गोष्टी।
परहितनिरतांची आत्मकार्यी न दृष्टि॥ ३०॥

अहो महत्त्वं महतामपूर्वं
विपत्तिकालेऽपि परोपकारः।
यथास्यमध्ये पतितोऽपि राहोः
कलानिधिः पुण्यचयं ददाति॥ ३१॥
अहो भल्याची महती अपार।
विपत्तिकालींहि परोपकार॥
गेला शशी राहुमुखांतरांत।
तथापि दे पुण्य जनां अनंत॥ ३१॥

मान्या एव हि मान्यानां मानं कुर्वन्ति नेतरे ।
शंभुर्बिभर्ति मूर्ध्नेन्दुं स्वर्भानुस्तं जिघृक्षति ॥ ३२ ॥

सज्जनचि सज्जनांचा राखिति सन्मान नैव अन्यजन ।
शशितें शंभु शिरीं धरि खाया त्या राहु पसरितो वदन ॥३२॥

पुराणमित्येव न साधु सर्वं
न चापि काव्यं नवमित्यवद्यम्
सन्तः परीक्ष्यान्यतरद्भजन्ते
मूढः परप्रत्ययनेयबुद्धिः ॥ ३३ ॥

प्राचीन होय म्हणुनी सगळें न वंद्य ।
होईल काय नव यास्तव काव्य निंद्य ॥
लावोनि घे निकष इच्छित वस्तु सुज्ञ ।
मानी परानुकरणें निजलाभ अज्ञ ॥ ३३ ॥

उदये सविता रक्तो रक्तश्चास्तमने तथा ।
संपत्तौ च विपत्तौ च महतामेकरूपता ॥ ३४ ॥

उदयीं रक्त जसा रवि अस्तींही रक्त तो असे तेवीं ।
स्थिति सम वा विषमा वा ज्ञाता परि एकरूपता ठेवी ॥३४॥

दोषाकरोपि कुटिलोपि कलंकितोपि ।
मित्रावसानसमये विहितोदयोपि
चन्द्रस्तथापि हरवल्लभतामुपैति
नैवाश्रितेषु महतां गुणदोषशंका ॥ ३५ ॥

विषभ्राता दोषाकर कुटिलही लांछनयुत ।
क्षयी तैसा मित्रावनतिसमयीं होय उदित ॥

तरी शंभू माथां वसति शशितें देत कळुनी ।
गुणा वा दोषा वा गणिति न भले आश्रितजनीं ॥ ३५ ॥

**सज्जनस्य हृदयं नवनीतं**
**यद्वदन्ति कवयस्तदलीकम् ।**
**अन्यदेहविलसत्परितापात्**
**सज्जनो द्रवति नो नवनीतम् ॥ ३६ ॥**

कविजन नवनीतासारिखें सज्जनांचें ।
वदति मन परी तें कोण मानील साचें ॥
निरखुनि परक्यांचा ताप सच्चित्त पावे ।
द्रव, परि नवनीता त्यामुळें काय व्हावें ॥ ३६ ॥

**वज्रादपि कठोराणि मृदूनि कुसुमादपि ।**
**लोकोत्तराणां चेतांसि को हि विज्ञातुमर्हति ॥ ३७ ॥**

कठोर वज्राहुनिही विशेष ।
मृदू पहातां कुसुमापरीस ॥
लोकोत्तरांचें मन याप्रमाणें ।
लोकोत्तरावांचुनि कोण जाणे ॥ ३७ ॥

---

# नीति आणि उपदेश

**अनुगन्तुं सतां वर्त्म कृत्स्नं यदि न शक्यते ।**
**स्वल्पमप्यनुगन्तव्यं मार्गस्थो नावसीदति ॥ ३८ ॥**

अनुकरण सज्जनांचें पूर्णत्वें जरि न जाहलें स्पष्ट ।
तरि अल्प मात्र कीजे चुकवी मार्गस्थही महाकष्ट ॥ ३८ ॥

प्रत्यहं प्रत्यवेक्षेत नरश्चरितमात्मनः
किं नु मे पशुभिस्तुल्यं किं नु सत्पुरुषैरिति ॥३९॥
प्रतिदिन मनुजें अपुलें चरित्र निर्मळ मनें विलोकावें।
तुलना जगांत पशुशीं अथवा मी सज्जनासवें पावें ॥ ३९ ॥

न द्विषन्ति न याचन्ते परनिंदां नु कुर्वते।
अनाहूता न चायान्ति तेनाश्मानोपि देवताः ॥४०॥
न द्वेष याचना वा निन्दा बोलाविल्याविणें गमन।
करिति न यास्तव पावाति पाषाणहि शुद्ध देवतामान ॥ ४० ॥

नैर्गुण्यमेव साधीयो धिगस्तु गुणगौरवम्
शाखिनोन्ये विराजन्ते खण्डयन्ते चन्दनद्रुमाः ॥४१॥
निर्गुणताचि सुखावह गुणवत्ता पाहिजे कशाला ती।
पादप चिरायु दुसरे चंदनतरु मात्र खंडिले जाती ॥ ४१ ॥

अगुरुरिति वदतु लोको गौरवमत्रैव ते पुनर्मन्ये।
दर्शितगुणैव वृत्तिर्यस्य जने जनितदाहेऽपि ॥४२॥
अगुरु असें तुज म्हणती गौरव आहे परी सदा स्पष्ट।
लोटी अग्नींत तुला त्यावरिही राहसी गड्या! तुष्ट ॥ ४२ ॥

आयाते च तिरोहितो यदि पुनर्दृष्टोन्यऽकार्ये रतः
वाचि स्मेरमुखो विषण्णवदनः स्वक्लेशवादे मुहुः ॥
अंतर्वेश्मनिं वासमिच्छाति भृशं व्याधीति यो भाषते
भृत्यानामपराधकीर्तनपरस्तन्मन्दिरं न व्रजेत् ॥ ४३ ॥
येतां दूर पळे दिसे तरि पुन्हा कार्यांतरीं जो रमे।
हासे भाषण चालतां निजविपत् सांगोनि दुःखी गमे ॥

आलों बोलुनिया घरांत शिरतो येवोनि डोकें धरी।
रागावे परिचारकावरि वृथा जावें न त्याच्या घरीं ॥ ४३ ॥

अतिपरिचयादवज्ञा संततगमनादनादरो भवति।
मलये भिल्लपुरंध्री चंदनतरुकाष्ठमिंधनीकुरुते ॥४४॥

अतिपरिचयें अवज्ञा संततगमनें अनादरोत्पत्ति।
मलयजचंदनकाष्ठें भिल्ली करिते स्वपाकनिष्पत्ति ॥ ४४ ॥

सहसा विदधीत न क्रिया—
मविवेकः परमापदां पदम्।
वृणते हि विमृश्यकारिणं
गुणलुब्धाः स्वयमेव संपदः ॥ ४५ ॥

सहसा न करा क्रिया कदा। अविवेकें ऱुळतात आपदा ॥
गुणलुब्ध वरी स्वयें तया। सतत श्री सुविचारि यत्क्रिया॥४५॥

अवन्ध्यकोपस्य विहन्तुरापदां
भवन्ति वश्याः स्वयमेव संपदः।
अमर्षशून्येन जनस्य जन्तुना
न जातहार्देन न विद्विषादरः ॥ ४६ ॥

ज्याचा कोप अमोघ जो हरितसे आपत्तिही दुस्तर।
होती सत्वर, थोर त्यास गणुनी स्वाधीन सारे नर ॥
नाहीं राग जयास मित्र अथवा तो शत्रु झाला तरी।
कोणी आदर वा न भीति तिळही त्याची धरी अन्तरीं ॥ ४६ ॥

महता पुण्यपण्येन क्रीतेयं कायनौस्त्वया।
पारं दुःखोदधेर्गन्तुं तर यावन्न भिद्यते ॥ ४७ ॥

तनुनौका हे घेसी देउनिया पुण्यमूल्य जें गांठीं।
भंग न पावे तोंवरि यत्नें दुःखाब्धितीर बा गाठीं। ॥ ४७ ॥

"अतिपरिचयादवज्ञा" इति यद्वाक्यं मृषैव तद्भाति।
अतिपरिचयेप्यनादौ संसारेस्मिन् न जायतेऽवज्ञा॥ ४८॥

"अतिपरिचये अवज्ञा" वाक्य न अन्वर्थ हें मला गमतें।
अतिपरिचयेंहि कोठें न भवावज्ञा कदापि आढळते ॥ ४८ ॥

अहो नु कष्टं सततप्रवासः
ततोपि कष्टः परगेहवासः।
कष्टाधिका नीचजनस्य सेवा
ततोपि कष्टा धनहीनता च ॥ ४९ ॥

दे कष्ट लोकीं सततप्रवास।
त्याहूनि देतो परगेहवास।
सेवा असे कष्टतरा खलाची॥
दारिद्र्य सर्वांहुनि फार जांची ॥ ४९ ॥

अनंतपारं किल शब्दशास्त्रं
स्वल्पं तथायुर्बहवश्च विघ्नाः।
सारं ततो ग्राह्यमपास्य फल्गु
हंसो यथा क्षीरमिवांबुमध्यात् ॥ ५० ॥

हें शब्दशास्त्र समजोनि अनंतपार।
आयुष्य अल्पहि तशामधिं विघ्न फार॥
विस्तार टाकुनि बुधें ग्रहणीय सार।
घे हंस दूधचि जसें वगळोनि नीर ॥ ५० ॥

सुखार्थी च त्यजेद्विद्यां विद्यार्थी च त्यजेत्सुखम् ।
सुखार्थिनः कुतो विद्या कुतो विद्यार्थिनः सुखम् ॥ ५१॥

न सुखार्थी विद्येतें मिळवी विद्यार्थिही सुखा पावे ।
जें साध्य तेंचि यत्नें साधावें स्थिरमनेंचि वागावें ॥ ५१ ॥

यत्र विद्वज्जनो नास्ति श्लाघ्यस्तत्राल्पधीरपि ।
निरस्तपादपे देशे एरंडोपि द्रुमायते ॥ ५२ ॥

विद्वज्जन जेथ नसे मतिमंदहि तेथ पावतो महती ।
निष्पादपदेशामधिं एरंडातेंहि वृक्षसे गणिती ॥ ५२ ॥

यो हि कारणतः क्रोधं संजातं क्षन्तुमर्हति ।
नालं स मनुजः सम्यक् त्रिवर्गं परिरक्षितुम् ॥ ५३ ॥

सकारण क्रोध करील शांत ।
त्याचें नसे कारण या जगांत ॥
धर्मार्थकामाक्षम होय जन्तु ।
संसार त्याचा जणुं मोक्षहेतु ॥ ५३ ॥

वरं दारिद्र्यमन्यायप्रभवाद्विभवादपि ।
शरीरे कृशता रम्या स्थूलता न तु शोथिता ॥५४॥

नलगे अन्यायार्जित वित्त तयाहुनि दरिद्रता बरवी ।
अंगीं कृशता चाले मेद तशी सूजही कशास हवी ॥ ५४ ॥

---

## अन्योक्ति

हे हेमकार परदुःखविचारमूढ
किं मां मुहुः क्षिपसि वारशतानि वन्हौ ।

संदीप्यते मयि सुवर्णगुणातिरेको
लाभः परं खलु मुखे तव भस्मपातः ॥ ५५ ॥

हे अन्यदुःखनिरपेक्ष सुवर्णकार !
अग्नींत कां मजसि टाकिसि नैकवार ॥
होतांचि तप्त मम होय गुणातिरेक ।
बापा! मुखांत शिरते तव मात्र राख ॥ ५५ ॥

रात्रिर्गमिष्यति भविष्यति सुप्रभातं
भास्वानुदेष्यति हसिष्यति पद्मजालं ।
इत्थं विचिन्तयति कोशागतद्विरेफे
हा हन्त हन्त नलिनीं गज उज्जहार ॥ ५६ ॥

जावोनि रात्र विलया घडतां प्रभात ।
भानु स्वयें विकसवील सरोजजात ।
कोशस्थितालि करि जोंवरि हा विवेक
निर्मूल तों गज करी नलिनीस एक ॥ ५६ ॥

केतकीकुसुमं भृंगः खंड्यमानोऽपि सेवते ।
दोषाः किं नाम कुर्वन्ति गुणापहृतचेतसः ॥ ५७ ॥

देती जरी अमित कंटक ताप जीवा
ही केतकी परि गमे भ्रमरा विसावा ।
ज्याचें असे मन गुणावरि लुब्ध झालें
त्या दोष तुच्छ सगळे, जरि आड आले ॥ ५७ ॥

कर्तव्यो हृदि वर्तते यदि तरोरस्योपकारस्त्वया
मा काळं गमयांबुवाह समये सिंचैनमंभोभरैः ।

शीर्णे पुष्पफले दले विगलिते मूले गते शुष्कतां
कस्मै किं हितमाचरिष्यसि परीतापस्तु ते स्थास्यति ५८

कीजे म्यां उपकार या तरुवरीं इच्छा जरी हे मनीं ।
मेघा व्यर्थ न कालयापन बरें वृष्टी करीं या क्षणीं ॥
होती पुष्पफलें विशीर्ण, गळती पर्णें, मुळें शोषती ।
पश्चात्तापचि तैं, कशी परहितीं होई क्षमा त्वन्मति ॥ ५८ ॥

नाभिषेको न संस्कारः सिंहस्य क्रियते वने ।
विक्रमार्जितराज्यस्य स्वयमेव मृगेंद्रता ॥ ५९ ॥

सिंहाला न वनीं पशु करिती अभिषेक तेविं संस्कार ।
स्वभुजार्जितराज्यत्वें होय मृगेंद्र स्वयेंचि साचार ॥ ५९ ॥

प्राक् पादयोः पतति खादति पृष्ठमांसम्
कर्णे कलं किमपि रौति शनैर्विचित्रम् ।
छिद्रं निरूप्य सहसा प्रविशत्यशंकम्
सर्वं खलस्य चरितं मशकः करोति ॥ ६० ॥

पायां पडे प्रथम घे मग पृष्ठमांस ।
कर्णीं वदे मधुर मुग्धहि सावकाश ॥
पाहोनि छिद्र सहसा करितो प्रवेश ।
कांहीं खलांत मशकांत नसे विशेष ॥ ६० ॥

कर्णामृतं सूक्तिरसं विमुच्य
दोषेषु यत्नः सुमहान् खलस्य ।
अवेक्षते केलिवनं प्रविष्टः
क्रमेलकः कंटकजालमेव ॥ ६१ ॥

कर्णामृता सुवचना त्यजुनी, पुढारीं।
दोषाकडेचि वळते खलदृष्टि सारी॥
क्रीडावनांत शिरला जरि उष्ट्र दैवें।
पाहोनि कंटकतरूप्रति मोद पावे॥ ६१॥

अखिलेषु विहंगेषु हन्त स्वच्छंदचारिषु।
शुक! पंजरबंधस्ते मधुराणां गिरां फलम्॥६२॥

स्वच्छंदें संचरती खग सर्व परंतु हे शुका तुजला।
पंजरबंध मिळाला मधुर गिरांचा प्रसाद हा फळला॥ ६२।

दानार्थिनो मधुकरा यदि कर्णतालात्
दूरीकृता मधुकरेण मदांधबुद्ध्या।
तस्यैव गंडयुगमंडनहानिरेषा
भृंगाः पुनर्विकचपद्मवने चरन्ति॥ ६३॥

दानार्थ ये मधुप त्याप्रति दूर लोटी।
कर्णानिलें, द्विप करोनि घमेंड मोठी॥
तद्गंडभूषण परी विलयास जाई।
भृंगालि तों विकचपद्मवनांत राही॥ ६३॥

रे राजहंस! किमिति त्वमिहागतोसि
योऽसौ बकः स इह हंस इति प्रतीतः।
तद्गम्यतामनुपदं च पुनः स्वभूमौ
यावद्वदन्ति बक एष न मूढलोकाः॥ ६४॥

आलासि हंस वद एथ बरें कशाला
एथें बकास तव मान असे मिळाला।

आलासि तेविं निलया परतोनि जाई।
देती न जों तुजहि मूर्ख बकत्व पाहीं ॥ ६४ ॥

यावत्फलोदयमुखः सहकार जात-
स्तावच्च कंटककुलैः परिवेष्टितोऽसि ।
छायापि ते न सुलभा फलमस्तु दूरे
त्वं निष्फलो वरमहो सुखसेवनीयः ॥ ६५ ॥

येणार आम्र! तुज जों फल, कंटकांनीं।
केलासि आवृत अहा! तंव या जनांनीं॥
छायाहि दुर्लभ घडे फल दूर हाय!।
त्वान्निष्फलत्वचि बरें सुखसेवनीय ॥ ६५ ॥

हंसः प्रयाति शनकैर्यदि जातु तस्य
नैसर्गिकी गतिरियं न हि तत्र चित्रम्।
गत्या तया जिगमिषुर्बक एष मूढः
चेतो दुनोति सकलस्य जनस्य नूनम् ॥ ६६ ॥

टाकीत मंद पद हा कलहंस जाई।
नैसर्गिकी गति तशी, न विशेष कांहीं॥
दंभें परंतु बक मूर्ख वरी तयेतें।
तेव्हां खरें रसिकचित्त विदीर्ण होतें ॥ ६६ ॥

धनिनि जने चटुपटुतां जल्पतु रसना रसाशने लुब्धा।
त्वमशनपाननिरस्तं मस्तक! चरणे कथं लुठसि ॥ ६७॥

रसना रसलुब्धा हे मधुर वदे धनिजनासि तें सरळ।
पानाशनहीनहि तूं लोळसि कां मस्तका! पदाजवळ॥ ६७॥

यद्वक्त्रं मुहुरीक्षसे न धनिनां ब्रूषे न चाटून् मृषा
नैषां गर्ववचः शृणोषि नच तान् प्रत्याशया धावसि ।
काले बालतृणानि खादसि परं निद्रासि निद्रागमे
तन्मे ब्रूहि कुरंग कुत्र भवता किं नाम तप्तं तपः ॥ ६८ ॥

वारंवार धनाढ्यवक्त्र बघुनी खोटें न तूं बोलसी ।
तद्गर्वोक्ति न ऐकसी न पुढती आशेमुळें धावसी ॥
वेळीं खाउनि कोंवळें गवतही निद्रा सुखें सेविसी ।
तेव्हां हे मृग! कोणतीं वद कुठें केलीं तपें त्वां कशीं ॥ ६८ ॥

कस्त्वं भोः कथयामि दैवहतकं मां विद्धि शाखोटकम्
वैराग्यादिव वक्षि साधु विदितं कस्मादिदं कथ्यते ।
वामेनात्र वटस्तमध्वगजनः सर्वात्मना सेवते
न च्छायापि परोपकारकरिणी मार्गस्थितस्यापि मे ॥ ६९ ॥

बा तूं कोण बरें? हताश जगतीं मी होय शाखोटक ।
वैराग्यें वदसी, खरें, तुजसि मी सांगेन माझें सुख ॥
दुर्मार्गी वट हा परंतु पथिक प्रेमें तिथें चालला ।
न च्छायाहि परोपकारकरिणी मार्गस्थितातें मला ॥ ६९ ॥

कोकिलोऽहं भवान् काकः समानः कालिमावयोः ।
अन्तरं कथयिष्यन्ति काकलीकोविदा जनाः ॥ ७० ॥

मी कोकिल तूं काक प्रत्यक्षचि कृष्णवर्ण दोघांचा ।
अंतर वदेल सत्वर जो जाणे कोकिलस्वना साचा ॥ ७० ॥

रे रे चातक! सावधानमनसा मित्र क्षणं श्रूयता-
मंभोदा बहवो हि सन्ति गगने सर्वेऽपि नैतादृशाः ।

केचिद्वृष्टिभिरार्द्रयन्ति जगतीं गर्जन्ति केचिद्वृथा
यं यं पश्यसि तस्य तस्य पुरतो मा ब्रूहि दीनं वचः॥७१॥

रे रे चातक ऐक सावध मनें सद्बोध मित्रा मम।
व्योमीं पुष्कळ हिंडती घन परी सारे न मानीं सम॥
कांहीं वृष्टिमुळें जनां सुखविती कांहीं वृथा गर्जती।
ज्यासी पाहसि त्यास त्यास अपुली सांगों नको दुःस्थिति॥७१

पिब पयः प्रसर क्षितिपांतिकम्
कलय कांचन कांचनशृंखलाम्॥
इदमवद्यतमं तु यदीहसे
भषण! संप्रति केसरिणस्तुलाम्॥७२॥

अंकीं निजे नृपतिच्या नव दुग्ध सेवीं।
राहो गळां कनकशृंखलिकाहि तेवीं॥
श्वाना! परी हरितुला धरिसी मनांत।
तें मात्र कृत्य अतिनिंद्य दिसे जनांत॥७२॥

मा गर्वमुद्वह विमूढपलाशपुष्प
यत्षट्पदः श्रयति मामतिगंधलुब्धः।
रे! मालतीविरहतो ज्वलदग्निकल्पम्
त्वां मृत्युकारणमवेत्य समाश्रितोऽसौ॥७३॥

आमोदलुब्ध अलि ये मम आश्रयाला।
हा गर्व रे तुज पलाश! हवा कशाला॥
तो मालतीविरहभीरु, मरावयाला।
कल्पाग्नि मानुनि तुला ह्मणिं सिद्ध झाला॥७३॥

हे मेघ मानमहितस्य तृषातुरस्य
त्यक्तत्वदन्यशरणस्य च चातकस्य ।
अंभःकणान् कतिचिदप्यदधुना विमुंच
नोचेद्भविष्यसि जलांजलिदानयोग्यः ॥ ७४ ॥

मेघा ! त्वदेकशरणास तृषातुरास ।
मानोन्नतास विहगोत्तम चातकास ॥
दे दोन वारिकण वेळ हवा कशाला ।
देशिल नंतर अपाप जलांजलीला ॥ ७४ ॥

कतिपयदिवसस्थायी पूरो दूरोन्नतोपि भविता ते ।
तटिनि ! तटद्रुमपातनपातकमेकं चिरस्थायी ॥ ७५ ॥

दूरोन्नतपूर तुझा तटिनी ! अल्पावधींत जाईल ।
हरहर ! तटद्रुपातनपातक चिरकाल मात्र राहील ॥ ७५ ॥

रे कंटकैर्निशितदुर्धरकोटिभागै-
र्मार्गे निपत्य किमुपार्जितमेभिरत्र ।
विद्धानि साधुजनपादतलानि तावत्
अन्याद्विजस्य वदनस्य कृतश्च भंगः ॥ ७६ ॥

सूच्यग्रतीक्ष्ण खलकंटकमंडळाला ।
मार्गीं पडोनि फळ काय कळे प्रभूला ॥
सच्छिद्र साधु पद हे करुनी, स्वकीय ।
वक्रासही घडवितें सहसा अपाय ॥ ७६ ॥

भो भोः करींद्र दिवसानि कियन्ति तावत् ।
अस्मिन् मरौ समतिवाहय कुत्रचित् त्वं ।

रेवाजलैर्निजकरेणुकरप्रमुक्तै-
भूयः शमं गमयितासि निदाघदाहम् ॥ ७७ ॥

रे रे करींद्र दिन संप्रति चार दोन।
एथें मरुस्थलिंत घालविं सावधान ॥
रेवानदींत मग तूं दयिताप्रदत्त-।
तोयें निदाघपरिताप करीं प्रशांत ॥ ७७ ॥

---

## दारिद्य

स्यादत्यन्तनिरक्षरः क्षितिपतिः श्रीकारमात्राश्रयात्
मंत्री तत्कथितार्थलेखनपटुस्तत्सेवको जायते ।
अध्येता तदगारमेव भजते विद्वांस्तु तं याचते
यावान् यस्य गिरा समं परिचयस्तावद्विदूरे श्रियः ॥७८॥

होतो पूर्ण निरक्षर क्षितिपति श्रीकारमात्राश्रयें ।
मंत्री तत्कथितार्थलेखनपटू तद्दास्य पावे स्वयें ॥
अन्नार्थी बटु तद्गृहीं करितसे तद्याचना पंडित ।
विद्येशीं जितुका प्रसंग तितुकी श्री दूर हें निश्चित ॥ ७८ ॥

अर्धं दानववैरिणा गिरिजयाप्यर्धं शिवस्याहृतम्
देवेत्थं जगतीतले स्मरहराभावे समुन्मीलति ।
गंगा सागरमंबरं शशिकला नागाधिपः क्ष्मातलं
सर्वज्ञत्वमधीश्वरत्वमगमत् त्वां, मां च भिक्षाटनम् ॥७९॥

विष्णू घेत शिवार्धदेह, उरला घे भाग देवी शिवा।
राजन् यापरि शंभुची न वसती राहे जगीं जेधवां ॥

व्योमीं चंद्र रसातलीं अहि निधे गंगा समुद्राप्रति।
सर्वज्ञत्व अधीश्वरत्व तुज ये मी होय भिक्षापति॥ ७९॥

हलमगु बलस्यैकोऽनड्वान् हरस्य न लांगलम्
क्रमपरिमिता भूमिर्विष्णोर्न गौर्न च लांगलम्।
प्रवहति कृषिर्नाद्याप्येषां द्वितीयगवं विना
जगति निखिले नेदृग् दृष्टं दरिद्रि कुटुंबकम्॥ ८०॥

बला हल असे, असे वृष हरा नसे लांगल।
पदप्रमित भूमिका हरिस त्या न उक्षा हल॥
कृषी न फलदा तयां अजुनि अन्य उक्षाविण।
कुटुंब जगतीतलीं विरल यापरी निर्धन॥ ८०॥

वाक्चक्षुःश्रोत्रलयं लक्ष्मीः कुरुते नरस्य को दोषः।
गरलसहोदरजाता तच्चित्रं यन्न मारयति॥ ८१॥

वाङ्नेत्रश्रोत्र हरी लक्ष्मी नर तेथ काय करणार।
गरलाची भगिनी ते मृत्यु न दे हा विशेष उपकार॥ ८१॥

गुरुतामुपयाति यन्मृतः
पुरुषस्तद्विदितं मयाऽधुना।
तनुलाघवहेतुरर्थिता
न मृते तिष्ठति सा मनागपि॥ ८२॥

मेला मनुष्य सहसा गुरुतेस पावे।
यांतील कारण असे मजलागिं ठावें॥
दे याचना सतत लाघव मानवाला।
न स्पर्श होय तिळमात्र तिचा मृताला॥ ८२॥

किमत्र हे चातक दीर्घकंठम्
प्रसार्य वक्रं करुणं विरौषि ।
रात्रौ दिवा वर्षति वारिदोत्र
तथापि पत्रत्रितयं पलाशे ॥ ८३ ॥

बा चातका ! पसरुनी मुख कासयाला ।
आरंभितोसि करुणस्वर रोदनाला ॥
वर्षे जरी घन अहर्निश साभिमान ।
पानें तथापि पळसा असतात तीन ॥ ८३ ॥

दारिद्र्य भोस्त्वं परमं विवेकि
गुणाधिके पुंसि सदानुरक्तम् ।
विद्याविहीने गुणवर्जिते च
मुहूर्तमात्रं न रतिं करोपि ॥ ८४ ॥

दारिद्र्य ! तूं फार सख्या विवेकि ।
मोठें तुझें प्रेम गुणाढ्य लोकीं ॥
विद्याविहीना अगुणा जना वा ।
नाहीं तुझा स्पर्श कदापि ठावा ॥ ८४ ॥

भक्ते द्वेषो जडे प्रीतिररुचिर्गुरुलंघनम् ।
मुखे कटुकता नित्यं धनिनां ज्वरिणामिव ॥ ८५ ॥

भक्तीं द्वेष जडीं रुचि गुरुलंघन कटुकता बहू वदनीं ।
धनिकाची ज्वरिताची तुल्यस्थिति वर्णिती कवी भुवनीं ॥ ८५ ॥

स्मृते सीदन्ति गात्राणि दृष्टे प्रज्ञा विनश्यति
अहो महदिदं भूतमुत्तमर्णाभिसंज्ञितम् ॥ ८६ ।

स्मरणें कांपती गात्रें दर्शनें बुद्धि चावळे ।
सावकार जया नाम भूत तें मजला कळे ॥ ८६ ॥

अन्तकोपि हि जन्तूनामन्तकालमवेक्षते ।
न कालनियमः कश्चिदुत्तमर्णस्य विद्यते ॥ ८७ ॥

अन्तकालाविणें नाहीं अन्तकाचें जना भय ।
सावकार परी नेणे काळवेळ सुनिर्दय ॥ ८७ ॥

न पश्यामो मुखे दंष्ट्रां न पाशं वा करांचले ।
उत्तमर्णमवेक्ष्यैव तथाप्युद्विजते मनः ॥ ८८ ॥

नसे मुखीं महादंष्ट्रा न धरी पाश वा करीं ।
देखतां सावकारातें परि भीति मना वरी ॥ ८८ ॥

शक्तिं करोति संचारे शीतोष्णे मर्षयत्यपि ।
दीपयत्युदरे वन्हिं दारिद्र्यं परमौषधम् ॥ ८९ ॥

चालण्या शक्ति दे मोठी शीतोष्णाचे हरी श्रम ।
जाठराग्नी करी दीप्त दारिद्र्यौषध उत्तम ॥ ८९ ॥

राजंस्त्वत्कीर्तिचंद्रेण तिथयः पूर्णिमाः कृताः ।
मद्गेहान्न बहिर्याति तिथिरेकादशी भयात् ॥ ९० ॥

तव कीर्तिचंद्र करितो सर्वातिथीलागि पूर्णिमा नृपते ।
भीतीनें सदनीं मम यास्तव एकादशी तिथी लपते ॥ ९० ॥

---

## सामान्य

सद्यः पुरीपरिसरेऽपि शिरीषमृद्वी
गत्वा जवात् त्रिचतुराणि पदानि सीता ।

गन्तव्यमस्ति कियदित्यसकृद् ब्रुवाणा
रामाश्रुणः कृतवती प्रथमावतारम् ॥ ९१ ॥

क्षणहि विपिनमार्गीं कष्ट व्हावे न रामा ।
त्वरित म्हणुनि गांठी जानकी ग्रामसीमा ॥
वदत मग कितीहो ! दूर जाणें अजून ।
परिसुनि दयिताचा कंठ आला भरून ॥ ९१ ॥

आपदां कथितः पंथा इंद्रियाणामसंयमः ।
तज्जयः संपदां मार्गो येनेष्टं तेन गम्यताम् ॥९२॥

इंद्रियसंयम इंद्रियलालन देतात संपदा विपदा ।
यापरि जाणोनि तुम्ही स्वीकारा मार्ग जो रुचेल सदा ॥९२॥

इहतुरगशतैः प्रयान्तु मूर्खा
धनरहिता विबुधाः प्रयान्तु पद्भ्याम् ।
गिरिशिखरगतापि काकपंक्तिः
पुलिनगतैर्न समत्वमेति हंसैः ॥ ९३ ॥

अश्वशतें मूर्ख फिरो धनरहित बुधा घडो प्रवास पदीं ।
गिरिशिखरस्थित काकहि पुलनस्थित हंसही कळे सपदि ॥ ९३ ॥

निद्राप्रियो यः खलु कुंभकर्णो
हतः समीके स रघूद्वहेन ।
वैधव्यमापद्यत तस्य कान्ता
श्रोतुं समायाति कथापुराणम् ॥ ९४ ॥

प्रसिद्ध निद्राप्रिय कुंभकर्ण । करी रणीं राम तयास चूर्ण ।
वैधव्य पावोनि तदीय कांता । कथापुराणांप्रति येत आतां ॥ ९४ ॥

यद्यपि बहु नाधीषे व्याकरणं पठ तथापि हे पुत्र।
स्वजनः श्वजनो माभूत् सकलं शकलं सकृत् शकृत् ॥९५॥

शिकसी न फार यद्यपि व्याकरणा पढ तथापि अल्प सुता।
स्वजना श्वजना न करीं सकला शकला सकृत् शकृता॥ ९५॥

अहो ! खलभुजंगस्य विचित्रोयं वधक्रमः।
अन्यस्य दशति श्रोत्रमन्यः प्राणैर्वियुज्यते ॥ ९६॥

अहो! खलभुजंगाची विचित्र वधपद्धति।
डसे कानास एकाच्या मृत्यु देतो दुज्याप्रति॥ ९६ ॥

शिरसा धार्यमाणोऽपि सोमः सौम्येन शम्भुना।
क्रमेण कृशतां धत्ते कष्टः खलु पराश्रयः॥ ९७ ॥

दैवें महाश्रय जरी मनुजा मिळाला।
स्वातंत्र्यहीन परि कष्टद वृत्ति त्याला॥
शान्तस्वभाव शिवही धरितो स्वमाथां।
लागे क्रमें क्षय अहा! परि रात्रिनाथा॥९७॥

नैषां सन्ध्याविधिरविकलो नाच्युतार्चापि सांगा
न स्वे काले हवननियमो नापि वेदार्थचिन्ता।
न क्षुद्वेलानियतमशनं नापि निद्रावकाशो
न द्वौ लोकावपि तनुभृतां राजसेवापराणाम्॥ ९८॥

सन्ध्या पूर्ण न, देवतार्चन नसे हा हा! यथापद्धति।
नाहीं होमाविधीहि योग्य समयीं स्वाध्याय वा निश्चितीं॥
वेळीं भोजन सावकाश न मिळे नाहींच निद्रासुख।
हाही लोक न अन्य लोकाहि तयां जे जाहले सेवक॥९८॥

किं जन्मना च महता पितृपौरुषेण
शक्त्यैव याति निजया पुरुषः प्रतिष्ठाम् ।
कुंभास्तु कूपमपि शोषयितुं न शक्ताः
कुंभोद्भवेन मुनिनांबुधिरेव पीतः ॥ ९९ ॥

मोठ्या कुळीं जनन, पौरुष पूर्वजांचें ।
व्यर्थ, स्वशक्ति मनुजा यश देत साचें ॥
कूपा न कुंभशत नेतहि शुष्कतेला ।
कुंभोद्भवें जलधिही जलहीन केला ॥ ९९ ॥

नरपतिहितकर्ता द्वेष्यतां याति लोके
जनपदहितकर्ता त्यज्यते पार्थिवेन्द्रैः ।
इति महति विरोधे वर्तमाने समाने
नृपतिजनपदानां दुर्लभः कार्यकर्ता ॥ १०० ॥

नरपतिहितकर्ता द्वेष्य होतो जनांला ।
जनपदहितकर्ता त्याज्य वाटे नृपाला ॥
दिसत जंव विरोधस्थान ऐसें नितांत ।
विरलचि उभयांचा कार्यकर्ता जगांत ॥ १०० ॥

अयं पटो मे पितुरंगभूषणम्
पितामहाद्यैरुपभुक्तयौवनः ।
अलंकरिष्यत्यथ पुत्रपौत्रकान्
मयाधुना पुष्पवदेव धार्यते ॥ १०१ ॥

लाभे वस्त्र पितामहास मम हें त्याच्या पित्यापासुनी ।
तातानें उपभोगिल्यावरि सुखें मी होय याचा धनी ॥

हें मी घेत फुलापरी तनुवरी पुत्रप्रपौत्रादिक ।
सेवोनी निधि हा सुतास अपुल्या देण्या असो उत्सुक॥१०१॥

अहमेव गुरुः सुदारुणाना-
मिति हालाहल मा स्म तात दृप्यः ।
ननु सन्ति भवादृशानि भूयो
भुवनेऽस्मिन् वचनानि दुर्जनानाम् ॥ १०२ ॥

अति दारुण मीच एक लोकीं। तव हालाहल गर्व हा वृथा कीं।
असती तुजसारिखेच भारी। जगतीं दुर्जन शब्द तापकारी॥१०२॥

कस्तूरिकामृगाणां नाभेर्गंधगुणमखिलमादाय ।
यदि पुनरहं विधिः स्या खलजिव्हायां निवेशयिष्यामि १०३

कस्तूरिकामृगाच्या नाभीचा सर्व काढुनी वास ।
होईन मी विधी तरि खलजिव्हाग्रीं करीन तद्वास ॥ १०३ ॥

गुरुरेकः कविरेकः सदसि मघोनः कलाधरोऽप्येकः ।
अद्भुतमत्र सभायां गुरवः कवयः कलाधराः सर्वे ॥१०४॥

एकचि गुरु एकचि कवि एक कलाधर सुरेश्वरास्थानीं ।
गुरु कवि कलाधर परी असती सारेच या सभास्थानीं॥१०४॥

यदि सन्ति गुणाः पुंसां विकसन्त्येव ते स्वयम् ।
नहि कस्तूरिकागंधः शपथेन विभाव्यते ॥ १०५ ॥

असतां सद्गुण अंगीं यत्नाविण तो स्वयें जना कळतो ।
कस्तूरिकासुवासा शपथ नको तो स्वयेंचि दरवळतो ॥ १०५॥

हृदयान्नापयातोऽसि दिक्षु सर्वासु दृश्यसे ।
वत्स राम ! गतोसीति संतापेनानुमीयसे ॥ १०६ ॥

हृदयीं असती रामा बाहेरहि तव चहोंकडे वास ।
गेलासि बालका हें व्यक्त करी तीव्रमानसत्रास ॥ १०६ ॥

तैलाद्रक्षेज्जलाद्रक्षेद्रक्षेच्छिथिलबंधनात् ।
मूर्खहस्ते न दातव्यमेवं वदति पुस्तकम् ॥ १०७ ॥

तैलजलापासुनिया राखा बंधन करूं नका शिथिल ।
मूर्खस्पर्श नसावा दाविति हा भाव पुस्तकें निखिल ॥ १०७ ॥

वैद्या वदन्ति कफपित्तमरुद्विकारान्
ज्योतिर्विदो ग्रहगतिं परिवर्तयन्ति ।
भूताभिषंग इति भूतविदो वदन्ति
प्राचीनकर्म बलवन्मुनयो वदन्ति ॥ १०८ ॥

ते वैद्य सांगति असे कफपित्तवात ।
ज्यौतीषिक ग्रह म्हणे विषम स्थितींत ॥
पंचाक्षरी वदत भूत असे घरांत ।
प्राचीनकर्म न भलें मुनि बोलतात ॥ १०८ ॥

अनध्यायेन वेदानामाचारस्य च वर्जनात् ।
आलस्यादन्नदोषाच्च मृत्युर्विप्रान् जिघांसति ॥ १०९ ॥

आलस्य मोठें शिकतो न वेद ।
आचारलोपें गणितो न खेद ॥
पदार्थ सेवी अशुचि त्रिकालीं ।
ने मृत्यु विप्रा म्हणुनी अकालीं ॥ १०९ ॥

" ज्वलति चालितेंधनोग्निर्विप्रकृतः पन्नगः फणां कुरुते "
तत्तेजस्वी पुरुषः परकृतनिकृतिं कथं सहताम् ॥ ११० ।

अग्नी गमे प्रखर इन्धनचालनानें ।
दावी फणा अहि झणीं अपकारदानें ॥
केवी जनांत मग मानधनावतंस ।
अन्यापकार नर साहिल सावकाश ॥ ११० ॥

आसीन्नाथ पितामही तव मही माता ततोऽनंतरम्
संप्रत्येव च सांबुराशिरशना जाया जयोद्भूतये ।
पूर्णे वर्षशते भविष्यति पुनः सैवानवद्या स्नुषा
युक्तं नाम समस्तशास्त्रविदुषां लोकेश्वराणामिदम् ॥१११॥

राजन् होय पितामही तव मही माता पुढें जाहली ।
आतां होउनि तीच सिंधुरशना जाया जया पावली ॥
वर्षें शंभर लोटतां फिरुनि ती होईल साध्वी स्नुषा ।
हें का योग्य समस्तशास्त्रनिपुणा लोकेश्वरा पूरुषा ॥ १११ ॥

उच्चित्योच्चित्य भुवि प्रहितनिगूढात्मदूतनीतानाम् ।
विजिगीषुरिव कृतांतः शूराणां संग्रहं कुरुते ॥ ११२ ॥

वेंचुनि उचलुनि लोकीं धाडुनिया गुप्त हेर तत्काळ ।
जयशाली भूप तसा करिताहे शूरसंग्रहा काळ ॥ ११२ ॥

अद्वैतं सुखदुःखयोरनुगतं सर्वास्ववस्थासु यत्
विश्रामो मनसश्च यत्र जरसा यस्मिन्नहार्यो रसः ।
कालेनावरणात्ययात्परिणते यत्स्नेहसारे स्थितम्
भाग्यं तस्य सुमानुषस्य कथमप्येकं हि तल्लभ्यते॥११३॥

जें दुःखांत सुखांतही अनुसरे छायेपरी सर्वदा ।
जेथें चित्त रमे जराहि न हरी गोडी जयाची कदा ॥

कालें प्रेमफलास ये परिणती लज्जत्वचासंक्षयें।
एकाद्याचि नरास हें मिळतसे सद्भाग्य पुण्याश्रयें॥ ११३॥

संगमविरहवितर्के वरमिह विरहो न संगमस्तस्याः।
संगे सैव तथैका त्रिभुवनमपि तन्मयं विरहे॥ ११४॥

संग प्रियवस्तूचा नलगे व्हावा तिचा मला विरह।
संगीं एकचि ती परि विरहीं तद्रूप विश्वही अहह॥ ११४॥

च्युता दंताः सिताः केशा वाङ्निरोधः पदे पदे।
पातसज्जमिमं देहं तृष्णा साध्वी न मुञ्चति॥ ११५॥

पडले दांत जहाले केश धवल जीभ होतसे अडवी।
मरणोत्सुक देह परी तृष्णा साध्वी तयाप्रती अडवी॥ ११५॥

अकृत्वा परसंतापमकृत्वा खलनम्रताम्।
अनुसृत्य सतां वर्त्म यत्स्तोकमपि तद्बहु॥ ११६॥

देतां ताप न अन्या करितां न खलाप्रती नमस्कार।
सन्मार्गा अनुसरुनी जें थोडें तेंहि वाटतें फार॥ ११६॥

अनाचारेण मालिन्यमत्याचारेण मूर्खता।
विचाराचारयोर्मार्गः सदाचारः स उच्यते॥ ११७॥

मालिन्य सदाचारें अत्याचारेंहि मूर्खता फार।
आचारविचारांचा जो मार्ग तया म्हणा सदाचार॥ ११७॥

विधिरेव विशेषगर्हणीयः
करट त्वं रट कस्तवापराधः।
सहकारतरौ चकार यस्ते
सहवासं सरलेन कोकिलेन॥ ११८॥

विधिचाचि समस्त दोष हा। करि काका! ध्वनि तूं कठोर हा!।
सहकारतरूवरी दिली। तुज जेणें पिकसंगती भली ॥ ११८ ॥

---

## संवत्सरवर्णन

विविधभूमिरुहप्रसवोद्भवे
दिशि दिशि प्रसरत्यपि सौरभे।
विकसितं भजते न लता मधौ
क इह वेत्तुमलं वनितान्तरम् ॥ ११९ ॥

चैत्रीं अनेकविध पुष्पलतासुवास।
आनंदवी रसिकमंडलमानसास ॥
पावे परी क्षण न जातिलता विकास।
जाणेल कोण जगतीं वनितान्तरास ॥ ११९ ॥

हृदयसुभगः कामं शीतः पटीररसो मुहु-
स्तुहिनशिशिरं नीरं सौधः प्रवातमनोहरः।
विविधकुसुमामोदस्फीतो गृहोपवनाशुगः
क्लमयतितरां राधो मासस्तथापि तनुं नृणाम् ॥ १२० ॥

लावी शीत सुगंध चंदनरसें देहीं उटी साजिरी।
सेवोनी हिमनीर वातसुलभा हर्म्याग्रपृष्ठावरी ॥
नानापुष्पसुवासही घडिघडी सेवी सुखानें नर।
वैशाखीं परि चंडभानुकिरणें तापे तनू दुस्तर ॥ १२० ॥

साहंकारं क्वचन विदधद्गर्जितान्यंबुमत्त्वात्
स्फूर्जद्विद्युद्विलसितभैररस्थिरां कान्तिमृच्छन्।

निःसारत्वात् क्वचिदथ परं पांडुभावं प्रयातो
भाग्यं नृणामनुहरति वा नीरदो मासि शुक्रे ॥१२१॥

गर्वोद्रेकें क्षणभरि करी गर्जना थोर कोठें।
कोठें विद्युद्विलसितवशें कान्तिचांचल्य मोठें॥
निःसारत्वें अतिशय कुठें पावतो पांडुभाव।
ज्येष्ठामाजीं जलद वरितो संपदांचा स्वभाव ॥ १२१ ॥

तिरस्कृते भास्वति नीरदैः शुचौ
विसारिणं भूमितले तमश्चयम्।
न जातु निन्दन्ति जना यतो महा-
सुखाशया दुःखमपि प्रसह्यते ॥ १२२ ॥

आषाढमासीं रवितें घनाली।
व्यापीत तेव्हां तम ये अकालीं॥
न दे परी त्या जन दोषलेशा।
सोशीतही दुःख जया सुखाशा ॥ १२२ ॥

पुरा तपे क्षीणजला कि[illegible]आपगाः
प्रसस्वनुर्द्दृ[illegible]तमा इवावनौ।
नभस्यमूः पूर्णजला न तु स्वनं
वितन्वते, क्षुद्रतमो हि जल्पति ॥ १२३ ॥

ग्रीष्मीं नदी शुष्कजला सगर्व।
वस्तू गणी गर्जुनि तुच्छ सर्व॥
निःशब्द ती श्रावणमास येतां।
पूर्णाशयाही, लघुतें अहन्ता ॥ १२३ ॥

रुन्धानाः किल कान्तिमत् शशभृतो भाद्रे घना मंडलम्
तत्संसर्गवशाज्जहत्यपि निजां नैसर्गिकीं कृष्णताम् ।
कोपाटोपवशीकृतेन मनसा द्वेषोपि सद्भिःसमम्
नूनं निर्मलयेदनिर्मलमपि द्वेष्टुः क्षणादन्तरम् ॥ १२४ ॥

आधीं आक्रमुनी सतेज विधुतें तत्संगती लाभतां ।
मेघीं भाद्रपदामधें त्यजियली नैसर्गिकी कृष्णता ॥
कोपावेशवशें खलें कलुपितें आरंभिला दारुण ।
लोकीं द्वेषहि साधुशीं तरि करी तो त्या भला तत्क्षण ॥ १२४ ॥

केदारेषु मनोहराः सुरभयः सन्मंजरीमंजुलाः
शालिस्तंबगणाः शिरांसि धरणीं नम्राणि सन्तन्वते ।
फुल्लत्पद्मकदंबकेऽपि मधुपास्तन्वन्ति गुंजामिषे
जायन्ते विनयप्रमोदविधये नूनं सतां संपदः ॥१२५॥

क्षेत्रामाजि मनोज्ञगंधयुत हे ज्यांचे तुरे शोभले ।
शालिस्तंब असे शिरें नमवुनी भूमीवरी वांकले ॥
फुल्लाब्जीं अलि आश्विनांत करिती सुश्राव्य गुंजारव ।
साधूंचे विनय प्रमोद बहु दे विश्वामधें वैभव ॥ १२५ ॥

यैरासिच्य जलानि जीवितमयं सस्यं क्षितिर्लंभिता
क्षीणास्तेपि परां गता धवलतामंभोधराः कार्तिके ।
येषामेव कृपा बभूव विसरद्ग्रीष्माग्निसर्वंकषा
प्रायः सच्चरिते तनोत्यकरुणां वामप्रवृत्तिर्विधिः ॥१२६॥

ज्याच्या वृष्टिमुळेंचि सृष्टि अखिला सस्यान्विता जाहली ।
यत्कारुण्यवशें रुजा प्रविलया ग्रीष्मर्तुची पावली ॥

त्या मेघा लघुता तथा धवलता हा! येतसे कार्तिकीं।
धात्याची बहुधा महात्मचरितीं वामप्रवृत्तीच कीं ॥ १२६ ॥

निःशेषं शिशिरीकरोति भुवनं मासः सहाः संततं
भानोरप्याहिमान्मरीचिनिचयान् चांद्रानिवाभासयन् ।
वत्सानां विरहेण किंतु विकलः पांथोयमेकांततः
प्रत्यूषस्युपयाति कामपि दशां चित्तेऽग्निनेव क्षतः ॥ १२७ ॥

तापा वारुनि मार्गशीर्ष महिना विश्वास आनंदवी ।
सूर्याचे अतिउष्णही किरण हा ज्योत्स्नेपरी भासवी ॥
वत्सांच्या विरहें परंतु पथिका संसार हा नावडे ।
तच्चित्तास जणों अहर्निश अहा! ज्वाला शिखीची जडे ॥१२७॥

शीतं विसारि किल विष्वगिदं सहस्ये
कांतिं रवेर्भगवतोऽपि करोति हीनाम् ।
काले प्रयाति नितरां विपरीतभावं
सामर्थ्यमभ्यधिकमल्पबलोऽपि याति ॥ १२८ ॥

पौषांत शीत जय पावतसे दिगन्तीं ।
भानूसही प्रभुस तें करि हीनकान्ति ॥
येतांच काळ विपरीत अहा! जगांत ।
सामर्थ्य अल्पबलही प्रकटी नितांत ॥ १२८ ॥

आस्वाद्य साधु मकरंदरसं यदीयं
गुंजां ततान परिपुष्टतनुर्द्विरेफः ।
तस्यामहो विधिनियोगविशोषितायाम्
माघे स याति लतिकांतरमंबुजिन्याम् ॥ १२९ ॥

सेवोनि यन्मधुरसाप्रति साभिलाष।
गुंजारवा भ्रमर पुष्ट करी विशेष॥
माघांत ती कमलिनी कृश दैवयोगें।
होतां लता इतर शोधि कृतघ्न वेगें॥ १२९॥

यत्रैवाकलयांबभूवुरनिशं धर्मं प्रियं प्राणतो
म्लेंच्छाचारविधानसक्तमनसस्तत्राधुना ब्राह्मणाः।
इत्यालोच्य विपर्ययप्रतिगतं दूनोऽखिलं भारतं
मासः फाल्गुनिको दहत्युपगतो होलीं वपुर्वन्हिना॥ १३०॥

प्राणाहूनिहि आवडे बहु जिथें सद्धर्म रात्रंदिन।
म्लेंच्छाचारविधानसक्त दिसती आतां तिथें ब्राह्मण॥
पावे भारतवर्ष दुःस्थिति अशी पाहोनि हें तत्क्षण।
दुःखी फाल्गुनमास हाय! करितो होळीस देहार्पण॥१३०

## शाकुंतलांतील कांहीं पद्यरत्नें

आपरितोषाद्विदुषां न साधु मन्ये प्रयोगविज्ञानम्।
बलवदपि शिक्षितानां आत्मन्यप्रत्ययं चेतः॥१३१॥

विद्वत्परितोष न जों प्रयोगकौशल्य मज न मानवतें।
पुष्कळ शिकल्यांचेंही चित्त अविश्वास आपुला धरितें॥१३१॥

सुभगसलिलावगाहाः पाटलसंसर्गसुरभिवनवाताः।
प्रच्छायसुलभनिद्रा दिवसाः परिणामरमणीयाः॥१३२॥

शीतोदकें सुखद मज्जन, पाटलाख्य—।
पुष्पांवरील वनवातहि देत सौख्य॥

छायेंत गर्द पडतांक्षणिं झोंप शान्त।
कोणा दिनांतरमणीय नको वरुंत ॥ १३२ ॥

यदाऽऽलोके सूक्ष्मं व्रजति सहसा तद्विपुलतां
यदर्धे विच्छिन्नं भवति कृतसंधानमिव तत्।
प्रकृत्या यद्वक्रं तदपि समरेखं नयनयो–
र्न मे दूरे किंचित्क्षणमपि च पार्श्वे रथजवात् ॥ १३३ ॥

दिसे जें दृष्टीला लघु सहज तें होय विपुल।
तुटे मध्यें त्यातें गमत दिधला जोड सरळ ॥
स्वभावें वक्राही समचि दिसते वस्तु नयना।
रथावेगें कांहीं जवळ न दुरी भासत मना ॥ १३३ ॥

अयं स ते तिष्ठति संगमोत्सुको
विशंकसे भीरु! यतोऽवधीरणाम्।
लभेत वा प्रार्थयिता न वा श्रियम्
श्रिया दुरापः कथमीप्सितो भवेत् ॥१३४॥

ज्यापासुनी गणिसि तूं अवधीरणेला।
तो मी समत्सुक तुझ्याचि समागमाला ॥
लक्ष्मी मिळेल भजका न मिळेल किंवा।
लक्ष्मीस इच्छित सुदुर्लभ केंवि व्हावा ॥ १३४ ॥

सरसिजमनुविद्धं शैवलेनापि रम्यम्
मलिनमपि हिमांशोर्लक्ष्म लक्ष्मीं तनोति।
इयमधिकमनोज्ञा वल्कलेनापि तन्वी
किमिव हि मधुराणां मंडनं नाकृतीनाम् ॥ १३५ ॥

कमल हृदयहारी शैवलेंही नितान्त ।
विधु मलिनकलंकें युक्तही तेविं कान्त ॥
रमवि मन बहू हे सुंदरी वल्कलेंही ।
रुचिरतनुजनातें भूषवी सर्व कांहीं ॥ १३५ ॥

यात्येकतोस्तशिखरं पतिरोषधीना-
माविष्कृतोऽरुणपुरःसर एकतोर्कः ।
तेजोद्वयस्य युगपद् व्यसनोदयाभ्यां
लोको नियम्यत इवात्मदशांतरेषु ॥ १३६ ॥

एकीकडे विलय पावत ओषधीश ।
व्यापीत भानु अरुणासह अन्य देश ॥
तेजोद्वयें सम निजव्यसनोदयांहीं ।
लोकस्थिती करिति काय नियन्त्रिता ही ॥ १३६ ॥

यास्यत्यद्य शकुन्तलेति हृदयं संस्पृष्टमुत्कंठया
कंठः स्तंभितबाष्पवृत्तिकलुषश्चिन्ताजडं दर्शनम् ।
वैक्लव्यं मम तावदीदृशमिदं स्नेहादरण्यौकसः
पीड्यन्ते गृहिणः कथं नु तनयाविश्लेषदुःखैर्नवैः ॥ १३७ ॥

जाते आज शकुन्तला म्हणवुनी चित्तास चिंन्ता जडे ।
अश्रू आवरितां गळा भरुनि ये कांहीं दिसेना पुढें ॥
राहें यद्यपि मी वनीं परि अशी स्नेहें मदीय स्थिति ।
कन्यानव्यवियोग दुःखद किती व्हावा गृहस्थांप्रति ॥ १३७ ॥

शुश्रूषस्व गुरून् कुरु प्रियसखीवृत्तिं सपत्नीजने
भर्तुर्विप्रकृतापि रोषणतया मा स्म प्रतीपं गमः ।

भूयिष्ठं भव दक्षिणा परिजने भाग्येष्वनुत्सेकिनी
यान्त्येवं गृहिणीपदं युवतयो वामाः कुलस्याधयः ॥१३८॥

सेवावें वडिलां मुली ! सवतिला मैत्रीण ऐसें गणीं ।
होतां नाथ विरुद्धही, उलट तूं बोलें न रागेजुनी ॥
व्हावें दासजनीं कृपापर, घनें उन्मत्तता दूषण ।
वागे यापरि ती खरी 'सुगृहिणी' वामा कुला लांछन ॥ १३८ ॥

यस्य त्वया व्रणविरोपणमिंगुदीनां
तैलं न्यषिच्यत मुखे कुशसूचिविद्धे ।
श्यामाकमुष्टिपरिवर्धितको जहाति
सोयं न पुत्रकृतकः पदवीं मृगस्ते ॥ १३९ ॥

होतां कुशव्रणित आनन, इंगुदीचें ।
त्वां तैळ लावुनि बरें करिजे जयाचें ॥
श्यामाकमुष्टिपरिवर्धित आड आला ।
मानीव पुत्र तव तो बहु दुःख ज्याला ॥ १३९ ॥

अस्मान् साधु विचिन्त्य संयमधनानुच्चैः कुलं चात्मनः
त्वय्यस्यां कथमप्यबांधवकृतां स्नेहप्रवृत्तिं च ताम् ।
सामान्यप्रतिपत्तिपूर्वकमियं दारेषु दृश्या त्वया
भाग्यायत्तमतः परं न खलु तद्वाच्यं वधूबंधुभिः ॥ १४० ॥

आम्ही संयमशील उच्चकुलही जाणोनिया आपलें ।
तैसें प्रेम इचें स्मरोनि, नच जें तद्बंधुंनीं जोडिलें ॥
सामन्यादरपूर्व अन्यललना तैसें इला वागवीं ।
भाग्याधीन पुढील सर्व वदणें तें काय तद्बांधवीं ॥ १४० ॥

अभिजनवतो भर्तुः श्लाघ्ये स्थिता गृहिणीपदे
विभवगुरुभिः कृत्यैस्तस्य प्रतिक्षणमाकुला ।
तनयमचिरात्प्राचीवार्कं प्रसूय च पावनं
मम विरहजां न त्वं वत्से शुचं गणयिष्यसि ॥१४१॥

भूपाच्या परिवारवेष्टित कुलीं तूं होउनी स्वामिनी ।
श्रीमंतींतिल कारभार बघतां जाशील कंटाळुनी ॥
प्राचीतें रवि त्यापरी सुत तुला होईल गे जेधवां ।
बाळे ! मद्विरहव्यथेस गणिसी तूं कासया तेधवां ॥ १४१ ॥

भूत्वा चिराय चतुरंतमहीसपत्नी
दौष्यन्तिमप्रतिरथं तनयं निवेश्य ।
भर्त्रा तदर्पितकुटुंबभरेण सार्धम्
शान्ते करिष्यसि पदं पुनराश्रमेऽस्मिन् ॥ १४२ ॥

होवोनी चिरकाल सिंधुरशनापृथ्वीसपत्नी जनीं ।
दौष्यन्तीतनयास अप्रतिहता स्थापोनि राज्यासनीं ॥
निश्चिंत स्वकुटुंबभार अवघा त्याच्यावरी ठेवुनी ।
बाळे ! येशिल कीं पुन्हा पतियुता या आश्रमीं पावनीं ॥१४२॥

अर्थो हि कन्या परकीय एव
तामद्य संप्रेष्य परिग्रहीतुः ।
जातो ममायं विशदः प्रकामम्
प्रत्यर्पितन्यास इवान्तरात्मा ॥ १४३ ॥

स्वामित्व कन्येवरि अन्यदीय ।
तीतें गृहा पाठवुनी स्वकीय ॥

निश्चिंत आत्मा मम आज झाला।
जशी दिली ठेव पुन्हा धन्याला ॥ १४३ ॥

अहन्यहन्यात्मन एव तावत्
द्रष्टुं प्रमादस्खलितं न शक्यम्
प्रजासु कः केन पथा प्रयाती —
त्यशेषतो वेदितुमस्ति शक्तिः ॥ १४४ ॥

क्षणोक्षणीं होय निजापराध। त्याचा घडेना कवणास बोध।
प्रजेमधें वागत केंवि कोण। एथें असे सावध दृष्टिकोण ॥ १४४ ॥

ज्वलति चलितेंधनोऽग्नि–र्विप्रकृतः पन्नगः फणां कुरुते ॥
प्रायः स्वं महिमानं क्रोधात्प्रतिपद्यते हि जनः ॥ १४५ ॥

अग्नी गमे प्रखर इंधनचालनानें।
दावी फणा अहि झणीं अपकारदानें ॥
क्रोधातिरेक घडल्याविण कोणताही।
प्राणी प्रभाव अपुला प्रकटीत नाहीं ॥१४५ ॥

सिद्धयन्ति कर्मसु महत्स्वपि यन्नियोज्याः
संभावनागुणमवेहि तमीश्वराणाम्।
किं वा भविष्यदरुणस्तमसां विभेत्ता
तं चेत्सहस्रकिरणो धुरि नाकरिष्यत् ॥ १४६ ॥

मोठें हि कार्य करिती जव सिद्ध दास।
तो स्वामिचाच महिमा गणिजे अशेष ॥
होता कसा अरुण सिद्ध तमा हराया।
सारथ्य त्या रवि न दे जरि आचराया ॥ १४६ ॥

मेदश्छेदकृशोदरं लघु भवत्युत्थानयोग्यं वपुः
सत्त्वानामपि लक्ष्यते विकृतिमच्चित्तं भयक्रोधयोः ।
उत्कर्षः स च धन्विनां यदिषवः सिद्ध्यन्ति लक्ष्ये चले
मिथ्यैव व्यसनं वदन्ति मृगयामीदृग्विनोदः कुतः ॥१४७॥

मेदश्छेद करी कृशोदर, तनुव्यापार होती झणी ।
भीतिक्रोधयुताहि हिंस्र पशुची वृत्ती कळे तत्क्षणीं ॥
लागे बाण चलाहि वस्तुवरि हा उत्कर्ष शूरा महा ।
मिथ्या कीं व्यसनासमान मृगया, आहे विनोदावहा ॥ १४७ ॥

पातुं न प्रथमं व्यवस्यति जलं युष्मास्वपीतेषु या
नादत्ते प्रियमंडनापि भवतां स्नेहेन या पल्लवम् ।
आद्ये वः कुसुमप्रसूतिसमये यस्या भवत्युत्सवः
सेयं याति शकुन्तला पतिगृहं सर्वैरनुज्ञायताम् ॥ १४८ ॥

आधीं जी जल पाजिल्याविण तुम्हां प्याली न अद्यावधि ।
नेघे पल्लव, भूषणें प्रिय जरी, स्नेहें तथापी कधीं ॥
येती तेविं फुलें नवीं प्रथम तैं जी उत्सवातें गणी ।
ती ही जाय शकुंतला पतिगृहीं द्या वृक्ष आज्ञा झणीं ॥ १४८ ॥

स्वसुखनिरभिलाषः खिद्यसे लोकहेतोः
प्रतिदिनमथवा ते वृत्तिरेवंविधैव ।
अनुभवति हि मूर्ध्ना पादपस्तीव्रमुष्णम्
शमयति परितापं छायया संश्रितानाम् ॥१४९॥

स्वसुखनिरभिलाषी कष्टसी अन्यकार्या ।
प्रतिदिन अथवा त्वद्वृत्ति ऐशीच आर्या ॥

प्रखर अनुभवोनी उष्णही मस्तकानें।
सुखविति तरु भूपा आश्रितां स्वलीनें ॥ १४९ ॥

आलक्ष्य दन्तमुकुलाननिमित्तहासै-
रव्यक्तवर्णरमणीयवचःप्रवृत्तीन्।
अंकाश्रयप्रणयिनस्तनयान् वहन्तो
धन्यास्तदंगरजसा मलिनीभवन्ति ॥ १५० ॥

ज्याच्या शोभति शुभ्र दन्तकलिका हासे अहेतू यदा।
बोले बोलहि बोबडे रमुनि ये अंकाश्रया सर्वदा ॥
त्यापुत्रा उचली तदंगरज तें मानी बरें भूषण।
संसारांत मनुष्य धन्य बहु तो पाही सुखाचे क्षण ॥ १५० ॥

शुभं भवतु.



# सुभाषित-मकरन्द

## अर्थबोधक व अवांतर माहितीच्या टीपा

श्लोक १-यांत शंकराचें व विष्णूचें (कृष्णाचें) वर्णन आहे. कामतात कृष्ण अनुष्टुभ्छंद-चरणांत अक्षरें आठ.

श्लोक २-मी जन्माला आलों यावरून पूर्वजन्मीं तुला वंदन केलें नाहीं हें सिद्ध आहे. आतां वंदन केल्यामुळें मुक्त झालों, पुन्हा वंदन करण्याची जरूर नाहीं. तेव्हां हे दोन्ही अपराध क्षमा कर. शिखरिणीवृत्त-रसैरुद्रैश्छिन्ना यमनसभलागः शिखरिणी ।

श्लोक ३-ईरिता=बोललेली, सांगितलेली. हुं=होय. (अनुमतिदर्शक अव्यय) शार्दूलविक्रीडित वृत्त.
सूर्याश्वैर्यदि मः सजौ सततगाः शार्दूलविक्रीडितम् ।

श्लोक ४-यांत जगत्प्रलयाच्या वेळचें श्रीविष्णूचें स्वरूप स्वभावोक्तीनें सुंदर वर्णिलें आहे. उपजातिवृत्त. इंद्रवज्रा व उपेंद्रवज्रा यांचें मिश्रण.

श्लोक ५-वरं ददाति इति वरदा. उत्साहेन गुरवः.

श्लोक ६-सारस्वत=वाङ्मय. धाम=तेज.

श्लोक ७-कूजत्=शब्द करणारा. हा रामरक्षेतील श्लोक आहे.

श्लोक १०-प्रभवः=धनिकाः, स्मय=गर्व.

श्लोक ११-आद्यकवि=वाल्मीकि. कोपनीय=राग आणण्यास योग्य. उपजाति वृत्त.

श्लोक १२।१३-श्लोकयुग्म=दोन श्लोकांचा एक अन्वय. पाथोनिधि= समुद्र. मन्थनोत्थ=मंथनापासून निघालेलें. लुंठन=लुटणें, चोरणें. इन्द्रवज्रावृत्त-स्यादिंद्रवज्रा यदि तौ जगौ गः ।

श्लोक १४-शरभ=सिंहालाही मारणारा एक बलिष्ठ पशु.

श्लोक १८-हा दोन अर्थांचा श्लोक आहे. यांत कवीचें व चोराचें सादृश्य गमतीनें खुबीदार वर्णिलें आहे. एकाच शब्दाचे अनेकार्थ

दाखविणें यास श्लेष असें म्हणतात. पद=पाऊल, श्लोकांतील पद. शब्द=आवाज. अर्थ=शब्दार्थ, पैसा. अलंकार =दागिने कवितेंतील उपमादृष्टांतादि अलंकार. सुवर्ण=सोनें, सु वर्ण=चांगले वर्ण, अक्षरें. रसा=पृथ्वी. रसांतर्गत=पृथ्वींत पुरलेलें. रस कवितेंतील करुण वीर वगैरे. दोष, कवितेंतील. दोषा=रात्र.

श्लोक २१–गीतिछद. यासच मराठींत आर्या म्हणतात. या वृत्तांत पहिल्या व तिसऱ्या चरणांत बारा आणि दुसऱ्या व चवथ्या चरणांत १८ मात्रा असतात. चार मात्रेवर गण तुटणें व विषमस्थानीं जगण न येणें. संस्कृतांतील आर्येस शेवटीं १५ मात्रा असतात. व तिचाच जास्त प्रचार आहे.

श्लोक २२–द्रुतविलंबितवृत्त–द्रुतविलंबितमाह नभौ भरौ।

श्लोक २३–अनामिका=करंगळीजवळचें बोट (जिला कांहींच नांव नाहीं अशी!)

श्लोक २५–कृत्स्न=सर्व. प्रबोध ज्ञान. माघ=माघकवि व माघ महिना.

श्लोक २८–दोषाकर शब्द श्लिष्ट आहे. दोषांचा आकर=खाण. दोषा= रात्र. कर=किरण.

श्लोक ३०–धवलयति नामधातु. जीवलोक=जग, सृष्टि. मालिनीवृत्त. ननमयययुतेयं मालिनी भोगिलोकैः।

श्लोक ३१–उपेंद्रवज्रावृत्त. इंद्रवज्रेचें पाहिलें अक्षर दीर्घ व इचें ऱ्हस्व इतकाच फरक.

श्लोक ३५–कुटिल=वाकडा स्वभावानें, वक्र आकृतीनें. मित्र=सूर्य व मित्र. वसंततिलका वृत्त. उक्तावसंततिलका तभजा जगौ गः।

श्लोक ३६–स्वागतावृत्त. स्वागता रनभगैर्गुरुणा च। नवनीत=लोणी.

श्लोक ३९–मार्गस्थो नावसीदति–मनुष्य नुसता सन्मार्गाला लागला तरी पुष्कळ झालें. तेवढ्यानेंही तो आपत्तीपासून मुक्त होतो.

श्लोक ४३–अगुरु=एक सुवासिक चंदन, पक्षीं हलका. आर्या छंद.

श्लोक ४४– कीर्तन=सांगणें. स्मेर=हास्य (स्मित.)

श्लोक ४६–वियोगिनीवृत्त. विषमे ससजा गुरुस्तथा। सभरा लौथ गुरु-

वियोगिनी । पहिल्या व तिसऱ्या चरणांत दहा आणि दुसऱ्या व चवथ्या चरणांत ११ अक्षरें असतात. अशा वृत्तांस विषमवृत्त म्हणतात.

श्लोक ४७–हार्द=प्रेम. जातहार्देन आदरो न, विद्विषा दरो न. वंशस्थ वृत्त. वदन्ति वंशस्थविलं जतौ जरौ ।

श्लोक ४९–एथें सार नांवाचा अलंकार होतो. 'उत्तरोत्तरमुत्कर्षः सार इत्यभिधीयते ।'

श्लोक ५५–वारशतानि=शेकडों वेळां. सु-वर्ण. चांगला वर्ण, तेजस्विता.

श्लोक ६०–पादयोःपतति=पायाशीं येतो, पायां पडतों. खादति पृष्ठ-मांसम्=पाठीला चावतो. मागें चुगल्या करितो. कलं रौति कानाशीं गुणगुणतो, चाहड्या सांगतो. छिद्र=व्रण, पडती बाजू. मशक=घुंगुरटें, डांस.

श्लोक ६४–अनुपदम्=त्याच पावलीं, लागलेंच. प्रतीतः=प्रत्ययास आला.

श्लोक ६६–चित्रम्–विचित्र; आश्चर्यकारक. जिगमिषुः=जाऊं इच्छिणारा.

श्लोक ६८–बालतृणानि=कोवळें गवत. काले=भुकेच्या वेळीं.

श्लोक ६९–शाखोटक=शेराचें झाड. सर्वात्मना=सर्व प्रकारें.

श्लोक ७०–कालिमा=काळेपणा. काकली=गोड, मृदु आवाज, (कोकि-लाचा )–कोविद=जाणता.

श्लोक ७१–एतादृशाः=अशा प्रकारचे ( उपकार करणारे. )

श्लोक ७२–कलय=धारण कर. ईहसे=इच्छितोस.

श्लोक ७३–अग्निकल्प, ईषन्यूनः आग्निःअग्निकल्पः

श्लोक ७४–महित=पूज्य. जलांजलि=ओंजळभर पाणी–पक्षीं मृताला द्याव-याची जलांजलि.

श्लोक ७७–मरु=मारवाडदेश. रेवा=नर्मदा. करेणु=हत्तीण. निदाघ =उन्हाळा.

श्लोक ७९-स्मरहर=शंकर. क्ष्मा=पृथ्वी. समुन्मीलति सति=झाला असतां.

श्लोक ८०–हल=नांगर, अगु=बैल नसलेला. अनड्वान् बैल. क्रम=पाऊल.

श्लोक ८२–तनुलाघव इ० याचना ही शरीराला हलकेपणा देणारी आहे. मनाक्=किंचित् सुद्धां.

श्लोक ८३–पत्रत्रितयं पलाशे=कोठेंही गेला तरी पळसाला पानें तीनच! हा श्लोक अर्वाचीन दिसतो. कारण यांत मराठी म्हण संस्कृतांत गोंवलेली आहे.

श्लोक ८५–दोन अर्थ आहेत. भक्त=परमेश्वराचा भक्त; पक्षीं भात. जड=मूर्ख मनुष्य; पक्षीं जड अन्न. अथवा डलयोरभेदात् जल. गुरुलंघन–मोठ्या लोकांचा अपमान. पक्षीं मोठ्या लंघनाची (न खाण्याची) आवश्यकता. कटुकता=भाषणांत कडूपणा, कठोरपणा पक्षीं तोंडाचा कडूपणा.

श्लोक ८६–सावकाराचें व भुताचेंही स्मरण होतांच शरीराला कष्ट होतात आणि बुद्धि चळते.

श्लोक ८९–औषधाचें व दारिद्र्याचें साद्दश्य. संचार=हिंडणें फिरणें.

श्लोक ९०–एकादशी माझ्या घरीं लपून राहिली. मला उपवास काढावे लागतात, मी दरिद्री आहे हें तात्पर्य.

श्लोक ९१–शिरीषमृद्वी=शिरीषाच्या फुलाप्रमाणें नाजूक.

श्लोक ९३–पुलिन=वाळवंट. पद्भ्यां पाद शब्दाला पद् असा आदेश होतो.

श्लोक ९५–श्वजन=कुत्र्यांचा जमाव. शकल=तुकडा. सकृत्=एकदा. शकृत्=घाण पदार्थ. व्याकरणानें 'अनर्थ' टळेल!

श्लोक ९८–सांगा=संपूर्ण. स्वे काले=योग्य वेळीं.

श्लोक ९९–कुंभोद्भव=अगस्ति ऋषि. यानें समुद्राचें आचमन केलें होतें.

श्लोक १०४–गुरु=बृहस्पति, श्रेष्ठ कवि=शुक्राचार्य, प्रसिद्ध कवि, कलाधर=चंद्र, कलाकुशल. मघोनः=इंद्राच्या.

श्लोक १०६–हे रामवियोगानें व्यथित झालेल्या दशरथाचे उद्गार आहेत.

श्लोक १०८–भूताभिषंग=भूतबाधा. भूतविद=पंचाक्षरी, मंत्रतंत्र जाणणारे.

श्लोक ११०–पहिलें अर्ध कालिदासाचें आहे.

श्लोक ११५–साध्वी स्त्री व चिन्ता यांचें साद्दश्य दाखविलें आहे.

श्लोक ११८–करट=कावळा. सहकार आम्रवृक्ष.

श्लोक ११९–संवत्सरवर्णन. यांत ओळीनें चैत्रवैशाखादिमासांचें एकेक श्लोकांत वर्णन आहे. विकसितम्=विकास. वसंत ऋतूंत जाईच्या वेलीला फुलें येत नाहींत.

श्लोक १२०–पटीररस=चंदनाचा रस. सौध=गच्ची. स्फीत=भरलेला. आशुग=वारा.

श्लोक १२१–अंबुमत्त्वात्=पाणी भरल्यामुळें. ऋच्छन्=जाणारा, पोंचणारा. पांडुभाव=पांढरेपणा. वा=जणूं काय!

श्लोक १२४–कांतिमत्=तेजस्वी. शशभृतः=चंद्रस्य.

श्लोक १२८–विष्वक्=चोहोंकडे. हीन=कमी, इलकी.

श्लोक १२९–गुंजा=भ्रमरांचा शब्द. अंबुजिनी=कमलिनी.

श्लोक १३०–दून=दुःख पावणारा. विधान=करणें.

श्लोक १३१–हें सूत्रधाराचें म्हणणें आहे.

श्लोक १३६–सकाळच्या वेळचें वर्णन-ओषधीनां पतिः=चंद्रः=युगपद् एकदम एकेच कालीं

श्लोक १३७–शकुन्तला सासरीं जात असतां तिच्या विरहानें कण्वाची मनःस्थिति कशी झाली हें एथें दाखविलें आहे.

काव्येषु नाटकं रम्यं तत्र रम्या शकुन्तला।
तत्रापि च चतुर्थोंकस्तत्र श्लोकचतुष्टयम् ॥ १ ॥

काव्यांत नाटक, नाटकांत शाकुन्तल, शाकुन्तलांत चवथा अंक व त्यांतही चार श्लोक उत्तम. त्याच पैकीं हा एक आहे.

श्लोक १३८–दक्षिणा=उदार वर्तन ठेवणारी. उत्सेक=गर्व. वामा=दुर्मार्गी स्त्री अथवा इतर, वरच्याहून भिन्न आचरण करणारी. चारी पैकीं हा दुसरा श्लोक.

श्लोक १३९–इंगुदी=एक प्रकारचें फळ, हिंगणमिठा. श्यामाक=एक प्रकारचें धान्य, सावे.

श्लोक १४१–प्राची+इव+अर्कम्. प्राची=पूर्वदिशा. श्लोकचतुष्टयांतील हा तिसरा श्लोक होय.

श्लोक १४२–निवेश्य=स्थापून (राज्ये इति शेषः) शान्ते हें आश्रमाचें विशेषण. हा चवथा श्लोक होय. या श्लोकांबद्दल कित्येकांचा थोडासा मतभेदही आहे.

श्लोक १४५–इन्धन=सरपण. विप्रकृतः=अपकार केलेला.

श्लोक १४६–नियोज्य=नेमलेला (सेवक) संभावनागुण=पारख करण्याची शैली. ईश्वर=धनी मालक.

श्लोक १४९–वृत्ति=वर्तन, वागणूक.

श्लोक १५०–अनिमित्तहास=कारण नसतां हसणें हा बालस्वभाव आहे. मलिनीभवन्ति च्विप्रत्यय.

## सूचि



---